■ **नवीन आवृत्ती** (सुधारीत)
जानेवारी २०१२


२२/१४-डी, पहिला मजला, रानडे हायस्कूलजवळ,
झावबावाडी, ठाकुरद्वार, **मुंबई - ४००००२**
**फोन : (०२२) २२०१ ९६६१**

■ **चित्रकार :**
श्री. सुनील पुजारी, **मुंबई**

■ **मुद्रक :**
लोकमान्य मुद्रणालय,
४०४, गुरुवार पेठ, चावडी चौक, **कराड**
**फोन : (०२१६४) २२२१५६**

■ **प्रकाशक :**
**श्री. दिवाकर प्र. दामले आणि अन्य साधक**
सी-३०४, केशवकुंज नं. १, ३ रा मजला, सेक्टर ३०,
सानपाडा रेल्वे स्टेशन जवळ, **वाशी (नवी मुंबई)**
**फोन : (०२०) २७८१ ३३६३**

**॥ श्रीगुरु:शरणम् ॥**

'श्रीं'च्या परमकृपेने, अधिक मजकुर समाविष्ट करून नवीन आवृत्ती छापण्याचा योग आला! मनस्वी आनंद झाला. ह्या 'श्रीं'च्या कार्यासाठी ज्यांचे ज्यांचे सहाय्य लाभलं, त्या सर्वांचे सर्वांगीण जीवन, सर्वार्थाने समर्थ, संपन्न, मंगलमय, आनंदमय, सात्त्विक, सुंदर व्हावं आणि राहावं म्हणून 'श्रीं'च्याच परम मंगल चरणीं, साष्टांग दंडवत घालून, प्रार्थना करतो.

गुरुदेवा, सर्वांना पोटाशी घ्या. आपल्या अमृतदृष्टीने सर्वांना निरंतर कृपांकीत करा. अधिक काय मागूं?

श्रीचरणरजसेवक
**आनंदस्वामी**
[श्रीपाद (सदानंद) भिकाजी ताटके ] मुंबई - २.

५ जानेवारी २०१२
(पुत्रदा एकादशी)

*** हा ग्रंथ कोणत्याही बुकडेपोत मिळणार नाही. ***

**फक्त खालील ठिकाणीच मिळू शकेल.**

**मुंबई - २** **श्री. सदानंद ताटके**
२२/१४-डी, पहिला मजला, रानडे हायस्कूलजवळ,
झावबावाडी, ठाकुरद्वार, **मुंबई - ४००००२**
**फोन : (०२२) २२०१ ९६६१**

**मुंबई - १६** **श्री. नीलेश खोत**
४ था मजला, ४०२, रामनाथ सोसायटी,
कर्नाटक हॉलसमोर, माहिम, **मुंबई - ४०००१६**
**फोन : (०२२) २४२१ ६५९०**

**पुणे - ३८** **श्री. विजय प्रभुदेसाई**
३१/३२, शाकुंतल अपार्टमेंट, ४ था मजला, ज्ञानेश्वर नगर,
कोथरुड बस स्टॅन्डसमोर, कोथरुड, **पुणे - ४११०३८**
**फोन : (०२०) २५४६ ०९०५**

**ठाणें -** **श्री. सुनील दामले**
'मयुरेश', मराठी शाळा क्रमांक १ समोर, टेंभी नाका,
**ठाणे (प.) - ४००६०१ मोबाईल : ९३२२३२६५५३**

सानपाडा **श्री. दिवाकर दामले**
सी-३०४, केशवकुंज नं. १, ३ रा मजला, सेक्टर ३०,
सानपाडा रेल्वे स्टेशन जवळ, **वाशी (नवी मुंबई)**
**फोन : (०२०) २७८१ ३३६३**

---

*** फोनवर पूर्वसूचना देवूनच ग्रंथ खरेदीसाठी जावे. ***

## • अंतरंग •



---

**...ी, आनंदमय जीवन कसें जगाल?**

॥ ॐ गं ॐ ॥
॥ श्रीगुरु:शरणम् ॥

# सुखी, आनंदमय जीवन कसें जगाल ?

## आम्ही आनंदयात्री . . .

सर्वशक्तिमान, दयाघन, प्रभु करुणासागर आहे. ' मनुष्य योनीत जन्म लाभण ' हे पतितपावन प्रभुचं मानवाला फार मोठ वरदान आहे. आपण त्यासाठी कृतज्ञ असल पाहिजे.

जीवनाचा गोफ सुखदु:खाच्या मुलायम धाग्यांनी विणलेला असतो. बहुधा त्यात सुख कमी आणि दु:ख बरच असण्याची शक्यता अधिक असते. जीवनाची खरी जाण दु:खामुळे येते. सुखाचं [illegible]र मोल, त्यामुळेच तर कळतं. खर ना ?

पूर्णत: निकामी अशी एकहि वस्तू ईश्वराने निर्माण केलेली नाही. [illegible]नुष्या, व्यक्तिच्या अधिक जवळ जाल तर त्यातील बरेच दोष [illegible]नि आपणाला जाणवतील. ते थोऽडे दूर करून आत डोकावलो [illegible]... काहीतरी शिकण्यासारख आपणाला तेथे नक्की आढळेल ! [illegible]च आमच जीवन त्यामुळे सुखी, समाधानी, आनंदमय, [illegible]मय होईल. नक्की.

कृतज्ञ होऊ. नम्र होऊ. निरपेक्ष होऊ. जिथे जिथे जे जे चांगल, उदात्त, भव्य, दिव्य मिळेल ते ते वेचत वेचत जीवनाची वाटचाल करू या.

कोणत्याहि स्थितीत आनंदात राहू. आनंद देत राहू. आनंद देत–घेत एक दिवस पूर्ण आनंदमय होऊं. आपल्या आजूबाजूने जाणारा एकादा वाटसरू थबकेल, किंचित् थांबून, तेथला अनामिक, मंद सुगंध अनुभवीत, दुसऱ्या वाटसरूला विचारेल, 'अहो बाबा, येथे कोणी आनंदयात्री होता का ?' तेवढ आपल्याला पुरे. खर ना ? आणि तेहि नाही घडल तर बिघडलं कुठ ?

**— आनंदस्वामी**

★ ★ ★

**सदा संतांपाशी जावे ।**
**त्यांचे जवळी बैसावे ॥**
**उपदेश ते न करिती ।**
**तरी ऐकाव्या त्या गोष्टी ॥**
**तेचि उपदेश होती ।**
**त्याही कष्ट नष्ट होती ॥**
**वासुदेव म्हणे संत ।**
**संगे करिती पसंत ॥**





## प्रार्थना

सकाळी उठल्यावर, दैनंदिन मुखमार्जनादि क्रिया आटोपल्यावर, दिनक्रमास सुरुवात करण्यापूर्वी अगर रात्री झोपण्यापूर्वी अत्यंत शांत चित्ताने करावयाची – प्रार्थना. ह्यावेळी उदबत्ती, तुपाचे निरांजन लावले तर दुधांत साखर पडेल !

**सर्वशक्तिमान दयाघन भगवंता,**
**आजचा दिवस तू जसा दिलास,**
**तसा मी तो आनंदाने स्वीकारला.**
**तुझ्या कृपेने उद्याचा दिवस, मला**
**आणि भोवतालच्या सर्वांना, सर्वार्थांनि**
**संपन्न करणारा दे.**
**प्रसंगवशात पदरी येणारे कष्ट,**
**अपमान, दुःख, विषाद लीलया**
**पेलण्याचे सामर्थ्य दे.**
**सुबुद्धि, सदाचार, सद्वर्तन आणि सद्गुणाबरोबर**
**आरोग्य, यश, बल, प्रज्ञा, संपन्न चारित्र्य दे.**
**सागरासारखं विशाल अंतःकरण दे.**
**प्रसंगोचित योग्य निर्णय घेण्याची बुद्धि दे.**
**सर्वांना सदैव सहाय्यभूत होण्यासाठी,**
**मला कायिक, वाचिक, मानसिक, आर्थिक आदि**
**सर्व तऱ्हेचे विपुल सामर्थ्य दे.**

**माझ्या आजुबाजूच्या सर्वांचे जीवन संपन्न कर.**
**माझी नित्य, नैमित्तिक उपासना अखंड चालू राहू दे.**
**उदरभरणासाठी तुझ्या कृपेने लाभलेल्या व्यवसाय,**
**उद्योगात मला सदैव कार्यरत, कर्तव्यतत्पर ठेव.**
**माझा धर्म आणि देश यांची सदैव भरभराट होऊ दे.**



## चला, चैतन्याचं स्वागत करूं या !

घरांत देवांच्या उजव्या हाताला म्हणजेच आपल्या डाव्या हाताला, गोडे तेलाचा–तिळाच्या तेलाचा वा भुईमुगाच्या तेलाचा दिवा, तुपाचे निरांजन व उदबत्ती, सकाळ संध्याकाळ न चुकता लावावी. त्याचवेळी धूप घालणे शक्य असल्यास अधिक चांगले. उदबत्ती हा धूपाचा छोटा प्रकार म्हणाना. तो देवांना सुगंधहि देतो; वातावरण प्रसन्न करण्यास मदत करतो. तेलाचा दिवा कर्मनाश करतो. शांति, तृप्ती, समाधान देतो. प्रदूषण नाशाचे संथपणे काम करतो. निरांजनासारख्या उभ्या पितळी दिव्यांत तेल घालून, तबकडी ठेवून त्यावर कंदिलासारखी अगदी छोटी गोलाकार काच ठेवल्यास, दिवा संथपणे जळू शकतो. सकाळ–संध्याकाळ एक वेळ कोजळी काढून तेल भरल्यास, तो २४ तास नंदादीपासारखा ठेवणे सहज शक्य होते. नंदादीप ठेवण्यास दरमहा अंदाजे २ किलो तेल लागते, म्हणजे हे काम खूप खर्चाचे नाही. घराला तो निःसंशय





शांति, आनंद, समाधान, तृप्ती देतो. असा माझा गेले ४८ वर्षांचा अनुभव आहे. अगदी खिशात पुरेसे पैसे नसले तरी समाधान भंगत नाही. तुपाचे निरांजन हे मांगल्य, समृद्धि, आनंद, वंशवृद्धि आणि चैतन्याचे प्रतिक आहे.

दररोज तिन्हीसांजा (ते अगदी अशक्य असेल तर, शहरातील मंडळींनी कामावरून घरी पोहोचताच लगेच) घरातील देवाना उदबत्ती, निरांजन, दूध–साखरेचा नैवेद्य अर्पण करून झाल्यावर देवासमोर छोटा पाट वा आसन ठेवावे. त्याच्या समोर देवांकडे तोंड करून डाव्या हाताला हळदीची व कुंकवाची स्वतंत्र वाटी ठेवावी. पाटावर/आसनावर हळद–कुंकू घालावे, 'आई ये, बस. तुझ स्वागत असो. कृपा कर. दया कर. सांभाळ. सर्वार्थाने समर्थ कर आणि तुझी सेवा करवून घे,' अशी प्रार्थना करावी; नंतर त्रैलोक्यजननी, आई श्रीमहालक्ष्मी, श्रीअन्नपूर्णा यांना उदबत्ती, निरांजन ओवाळून दूध–साखरेचा नैवेद्य अर्पण करावा. किरकोळ खर्चासाठी पैसे ठेवण्याचा घरांत जो डबा वा भांडे असेल तेथेहि हळद–कुंकू वाहून उदबत्ती, निरांजन ओवाळीत वर नमूद केलेली प्रार्थना म्हणावी. त्यानंतर रातील स्टोव्ह, गॅस, शेगडीवरहि हीच सर्व प्रक्रिया करावी. सकाळी पूजेच्या वेळी आठवणीने गंध–फूल घालून गॅस आदिंचे पूजन वे. त्यावेळी श्रीअन्नपूर्णा स्तोत्र म्हणावे व खालील श्लोक णावा.

**'अन्नपूर्णे सदापूर्णे शंकरप्राणवल्लभे ।**
**नवैराग्यसिद्ध्यर्थं भिक्षां देहि च पार्वती ।**

'कृपा कर, दया कर,' हे म्हणत असताना भावना ही हवी की 'हे दयाघना, करुणासागर प्रभो, मी कृपेला, दयेला पात्र आहे की नाही हे मला ठाऊक नाही. तू दयाळू, करुणाकर, भक्तवत्सल आहेस म्हणून तुझे ब्रीद राखण्यासाठी, तू मला पोटाशी घेऊन, कृपा, दया केली पाहिजेस, असा लडिवाळपणा हवा. 'सांभाळ' म्हणताना दारिद्र्यांत आत्महत्येचा, अंगिकृत कार्यापासून परावृत्त होण्याचा, पराभव स्वीकारण्याचा विचार नको. तेथे त्या वळणावर तू मला सांभाळ. भरपूर धन, धान्य, दाग–दागिने, वैभव, संपत्ति माझ्या चरणाजवळ लोळण घेत असताना, ह्या साऱ्याने माझी बुद्धी चळता कामा नये. संपत्तीचा कैफ नको, ही तुझीच कृपा आहे, ही जाण शाबूत, पक्की ठेवण्यासाठी त्या वळणावर मला तुझी मदत लागेल. चित्रकलेत, गाण्यात, लेखनात, अभिनयात, नोकरीत, व्यवसायात माझ्या कामाचा खास ठसा उमटल्यावर, माझ्या लौकिकाला गगन ठेंगणे होईल. त्यावेळी हे मनमोहना, ही तुझ्याच कृपेची बरसात आहे, ही माझी जाण पक्की ठेव. माझे पाय जमिनीवर घट्ट ठेव, बरं. सरतेशेवटी, वयाने, ज्ञानाने, लौकिकाने, चमत्काराने, संपत्तीमुळे, विद्वत्तेमुळे अगर अन्य काही कारणांनी, लोक जेव्हा मला नमस्कार करू लागतील, तेव्हा तो नमस्कार मला, ह्या देहाला नसून, माझ्यातल्या देवत्वाला, चांगुलपणाला, सामर्थ्याला, सज्जनतेला, भव्यतेला, दिव्यतेला, मांगल्याला म्हणजेच माझ्या श्रीसद्गुरु चरणांना आहे. मला नाही. तो नमस्कार ज्याचा त्याला पोहोचविण्यास कुचराई होऊ नये म्हणून तेथेहि तू मला सांभाळ !





काया, वाचा, मन, बुद्धि, विद्या, धन, यश, प्रज्ञा, चारित्र्य, उदारता आदि सर्वा, सर्वार्थाने समर्थ कर आणि शालीन, लीन बनव. सेवाभावाने, श्रीचरणसेवारत कर आणि ह्यात माझ काहीहि नाही, कर्ता, करविता तूच आहेस, मी निमित्तमात्र आहे, तुझ्या कृपादृष्टीच्या आश्रयाने !' अशी भावमधुर, समर्पणात ओलिचिंब भिजलेली, सुंदर, सरळ, सहज, सुगंधमय प्रार्थना हवी. असं सहर्ष स्वागत करा चैतन्याच की जे घरांत येता, येता आनंदाची, उत्साहाची उधळण करीत येईल !

★ ★ ★

## आम्ही कानांनी मंगल ऐकावें

**ॐ भद्रं कर्णेभिः शृणुयाम देवा भद्रं पश्येमाक्षभिर्यजत्राः ।**
**स्थिरैरंगैस्तुष्टुवांसस्तनूभिर्व्यशेम देवहितं यदायुः ॥**

**ॐ स्वस्तिनइंद्रो वृद्धश्रवाः स्वति नः पूषा विश्ववेदाः ।**
**स्वस्तिनस्तार्क्ष्यो अरिष्टनेमिः स्वति नो बृहस्पतिर्दधातु ॥**

**ॐ शांतिः । शांतिः । शांतिः ।**

हे देवहो ! आम्ही कानांनी मंगल ऐकावे, डोळ्यांनी उत्तम, शुभ पहावे आणि बलवान अवयवांनी तुमची स्तुति व सेवा करत असतानाच, देवांनी दिलेले पूर्ण आयुष्य व्यतीत करावे, अशी प्रार्थना आहे. महाकीर्तिमान असा इंद्र आमचे कल्याण करो. संवर्धक, वैभव-

संपन्न असा पूषा देव आमचे मंगल करो. तो अरिष्टनेमि असा पक्षिराज गरुड आमचे शुभ करो आणि वाणीचा अधिपति देवगुरु बृहस्पति नेहमी आम्हाला श्रेयस प्राप्त करून देवो.

सर्वत्र नेहमी शांतता वृद्धिंगत होत राहो.

★ ★ ★

## ॐ भद्रं कर्णेभि: . . .

'जे झाले ते झाले, वसंतराव. आता तुम्ही कुठून बोलता आहात ?'

'बोरीवलीहून. आबाजी माझी वाट पाहून १० मिनिटांपूर्वीच ट्रेनने दादरला रवाना झाले. मी रस्ता . . . '

'आल लक्षात. आता तुम्ही दादरला पूर्वी ठरल्याप्रमाणे मकरंदच्या घरी न येता, पारसी कॉलनीत पेंढरकरांच्या घरी या परस्पर. अच्छा.' मी फोन खाली ठेवला आणि थोड्या वेळाने टॅक्सीने पारसी कॉलनीकडे रवाना झालो. सोबत प.पू. श्रीआबाजी व इतर मंडळी होती.

श्रीक्षेत्र माणगाव येथील श्रीदत्त मंदिरातील, भक्त निवासासाठी मुंबईत आम्ही शनिवार, रविवारी भिक्षा गोळा करण्याचा **कार्यक्रम** ठरवला होता. प्रत्येक व्यक्तीला किती वाजता येणार, किती **थांबणार** आदि संपूर्ण तपशील कळवला होता. बऱ्याच ठिकाणी जायच **होत.** 'तुम्ही गाडी घेऊन बोरीवलीला येण्यापेक्षा मीच ट्रेनने दादरला **येतो.'**





असं श्रीआबाजींनी सूचवूनहि जाधवसाहेब, श्रीआबाजींचा त्रास वाचविण्यासाठी, गाडी घेऊन बोरीवलीस गेले. गडबडीत रस्ता चुकले. सुरुवातीलाच वेळेचे कोष्टक बिघडले.

मी मनस्वी चिडलो होतो. लोकांना ताटकळत राहाव लागणार म्हणून व्यथित होतो.

श्रीआबाजींना पुढील सर्व गोष्टींची कल्पना आली. त्यांनी घर सोडतानाच '**ॐ भद्रं कर्णेभि: ......**' सुरु केलं. मला मकरंदकडे पहाताच हसत ते म्हणाले. 'आनंदस्वामी, कसे आहात ? जाधवांच काय झाल ? कुठ अडचणींत तर . . . . '

'नाही, ठीक आहे. येतोय पेंढरकरांकडे. उशीर झाला खरा पण, पुढचे सर्व कार्यक्रम व्यवस्थित पार पडले; चिडचिड, बाचाबाची न होता. मग हळूच जाधव म्हणाले, 'दलदलीत काल पार्क केलेली गाडीच सकाळी हलत नव्हती. त्यात बोरीवलीत रस्ता चुकलो.'

'काहीहि असो. आमचं 'भद्रं कर्णेभि:' . . . . . कामाला आलं.' श्रीआबाजी हसत म्हणाले. आम्ही सर्व त्यात सामील झालो.

★ ★ ★

## सात्विक, संपत्ति, समृद्धि मिळविण्यासाठीं...

दर गुरुवारी तिन्हीसांजा देवासमोर (शक्यतो पूर्वेकडे तोंड करून) क छोटा पाट वा आसन ठेवा. त्यावर एका छोट्या वाटीत ६ ह्या कड्याने भाग जाईल अशी रक्कम ठेवा. ३० पैसे, ६० पैसे, ३०० , ६०० पैसे. त्या रकमेवर हळद-कुंकू वहा. उदबत्ती, निरांजनाने

ह्या महालक्ष्मीला ओवाळा. दूध–साखरेचा नैवेद्य अर्पण करा. नंतर प्रार्थना करा. 'आई ये, बस. तुझ स्वागत असो. कृपा कर. दया कर. सांभाळ. सर्वार्थानं समर्थ कर आणि श्रीचरणसेवारत कर.' दर वेळेला एकच रक्कम ठेवली पाहिजे अस नाही. ती तुम्ही कमी वा अधिक करू शकता. दरवेळी स्वतंत्र रक्कम ठेवावी. ती एका डब्यात बाजूला ठेवून द्यावी. लगेच खर्च करू नये. डब्यातील सुटे पैसे घेऊन नोटा – त्याबदली – डब्यात ठेवू नयेत. वर्ष–दोन वर्षे ही रक्कम तशीच ठेवावी. गुरुवारचे हे व्रत सुरूच ठेवावे. २ वर्षांनंतर गुरुवारीच **'त्या पैशांनी'** अगर **'ते पैसे'** अधिक इतर पैसे मिळून सुंदर वस्तू, स्कूटर, फ्रीज, मिक्सर, राहती जागा, गाडी आदि घेण्याचा योग येतो असा अनेकांचा अनुभव आहे.

गुरुवार हा गुरु ग्रहाचं अधिपत्य असलेला दिवस. ६ हा अंक शुक्राचा आहे, म्हणजेच वरील उपासनेमुळे सात्विक आणि कलात्मक सुंदर, आकर्षक, समृद्धि देणारीच वस्तू घरांत येईल तुमच्या कुटुंबाच वैभव वर्धिष्णू होईल. अनुभव घेऊन तर पहा ना

## देता किती घेशील, दो करांनी ?

माझं सारं म्हणणं ऐकून घेऊन बँक मॅनेजर म्हणाले, 'मला माहि[illegible] आहे, तांबेसाहेब. तुमचा एक थ्री–व्हीलर टेंपो आहे. आता आण[illegible] तुम्हाला फोर–व्हीलर घ्यायचा आहे. तुमचे सर्व पेपर्स मी न[illegible] तपासून पाहिले आहेत. गूड न्यूज फॉर यू. मी तुम्हाला ९० ह[illegible] ऐवजी १ लाख २० हजार रुपये मंजूर करू शकतो. करू मंजूर[illegible]





मी खूष होऊन म्हणालो, 'फारच छान.' अर्जात व इतर कागदपत्रांत जरूर त्या सुधारणा करून मी सह्या केल्या. कर्ज मंजूर झालं !

'सोबत पिशवी कसली आणली आहे ?'

'त्यात काही नोटा आणि चिल्लर नाणी आहेत ?'

'सर्व तुम्ही बँकेत डिपॉझिट करणार ?'

'काय हरकत आहे ?'

'हरकत कसली, पण रक्कम 'बंदी' करून, त्याच्या नोटा करून मग भरणा करायची.'

'नाही, साहेब. हे प्रासादिक पैसे आहेत. हे आहे तसेच बँकेत भरणार. माझा टेंपो तुमच्या साहाय्याने येणार असला, तरी त्याचा **खरा आधार म्हणजे ही लक्ष्मी ! हे सात्विक धन आहे !'**

'म्हणजे ?'

' दर गुरुवारी मी ६ ने भाग जाईल इतकी **रक्कम** .......'

मी संपूर्ण हकिगत बँक मॅनेजर श्री. करकरे **यांना** सांगितली. **त्यानाहि** सारे नवेच होते.

**'तुमच्या** श्रद्धेप्रमाणे अवश्य करा, तांबेसाहेब.' श्री. करकरे हंसून [illegible]णाले.

**मी ते** पैसे बँकेत स्वतंत्र भरले. रीतसर कर्ज **मंजूर** होऊन माझा [illegible]**–व्हीलर** टेंपो आला ! आश्चर्याची गोष्ट त्यानंतरचीच.

**त्या टेंपो**ला 'फिलिप्स'मध्ये कॉन्ट्रक्ट मिळाले **आणि** पहिल्या थ्री-[illegible]रला नवे मोठे काम मिळाले ! दोन्ही टेंपो भरपूर धंदा करू

लागले. मुदतीपूर्वी मी कर्ज परतफेड केली. आता मी ट्रान्सपोर्ट धंद्यातून बाहेर पडलो आहे. टेंपो विकले ते किफायतशीर रक्कम घेऊनच. तो 'फोर–व्हीलर' एका दूधाच्या व्यापाऱ्याला विकला. वर्ष झाल्यावर तो व्यापारी माझ्या रानडे रोड, दादरच्या घरी आला. हातात पेढे आणि श्रीफल ठेवीत तो मला म्हणाला, 'तांबेशेठ, तुमच्या 'फोर–व्हीलर'ने खूप धंदा केला. बरकत आणली. काही म्हणजे काही त्रास दिला नाही. खूप उपकार झाले.'

'उपकार कसले, जाधवशेठ,' मी कसबस म्हणालो. कृतज्ञतेने माझे डोळे पाणावले. मी हात जोडले. 'सात्विक धन-पूजा' सर्वांना समृध्द करीत होती !

## आई, तुझ्या कृपेच्या छायेत . . . .

एक कारकून म्हणून नोकरीला सुरुवात करणारे आणि आता इंजिनिअरिंग फॅक्टरीत पर्चेस ऑफिसर असलेले डोंबिवलीचे (पूर्व) श्री. दिलीप नाटेकर मला भेटले तेव्हा म्हणाले, 'मी जी जी काही संस्मरणीय खरेदी करतो. त्यांत वरील पूजनाचे थोडे तरी धन वापरतोच. सर्व वस्तू लाभदायक ठरल्या आहेत. तुम्हाला माहित आहे, आता मी २ रुम–किचन फ्लॅट घेतला आहे.'

'त्याचे पेमेंट ?'

**'सुरुवात ह्याच 'सात्विक धना'ने केली** ! पत्निला बँकेने कर्ज मंजूर केले. जागेचा ताबा घेतला.'

'पूर्वीच्या तुमच्या चार खोल्यांच काय केल ?'





'२ खोल्यां विकल्या.'

'आणि २ खोल्या ?'

'त्या तशाच ठेवणार आहे, लाभदायक म्हणून ! अरे व्वा ! अजून गुरुवारी 'सात्विक धन-पूजा' करता ना?'

'हे काय विचारता, स्वामी ? जे पेरतो ते भरघोस उगवत, हा अनुभव आम्ही सर्वांना सांगतो.'

'आता तुमचे स्नेहीसुद्धा . . . . .'

'हे पूजन करू लागले !'

**'सर्व मंगलमंगल्ये शिवे सर्वार्थसाधिके ।**
**शरण्ये त्र्यंबके गौरी नारायणि नमोऽस्तु ते ॥'**

मी हात जोडले, अपार कृतज्ञतेने. ★

• 'तीर्थात तीर्थपण, देवांत देवपण व **गुरूंत गुरुपण**, आपण आपल्या भावनेनें देतों. तीर्थास जाऊन जर **'आपण** यानें निष्पाप **होऊं** अशी भावना असली तरच मला तीर्थांचें **स्नान होईल**, नाहीतर **मला** तें नुसतें पाणीच आहे. थोडक्यांत म्हणजे **सर्व** कांहीं भावनेंत **आहे**.' प. पू. श्रीगोंदवलेकर महाराज आपल्या **शिष्याना** हें आवर्जून **सांगत** असत.

**सदिच्छा**, सद्भावना, सात्विकता अशीच **पूजनाने**, वंदनाने, **चिंतनाने** फुलू द्या. बहरू द्या. सुखावलेला जीव, तृप्त डोळ्यांनी **पाण्यातहि** अपार सुख आहे. .....नक्की. •

## प्रथम तुला वंदितों . . .

सर्वशक्तिमान, दयाघन भगवंताशी ऐक्य साधण्यासाठी चित्तवृत्ति शांत, निवांत, नि:शंक ठेवून प्रार्थना करावी. सुख-दु:खांत त्याची आठवण सदैव असावी. प्रार्थनेला किती ताकद आहे ? हे प्रार्थना केल्याशिवाय कळणार नाही. हा वर्णनाचा विषय नसून अनुभूतीचा भाग आहे.

आपल्या घरांत मंगलकार्य, प्रवासास जाणे, ऑपरेशन वा जबाबदारीचे कामकाज असल्यास उदबत्ती, निरांजन लावून सर्वप्रथम श्रीमंगलमूर्ति, माता-पिता, आचार्य, श्रीसद्गुरु, श्रीमहासरस्वती, श्रीमहालक्ष्मी, श्रीमहाकाली, श्रीअन्नपूर्णा, कुलदेवता–कुलदेव, शिवशंकर, मारुती, गृहलक्ष्मी (पत्नी) आदिंचे कृतज्ञतापूर्वक मनोमन स्मरण करून त्यांना दूधसाखरेचा नैवेद्य अर्पण करावा. तांदुळाचे, पिंजर लावलेले ४ / ६ दाणे भांड्यात टाकून, त्यावर स्वच्छ करून संपूर्ण धूवून घेतलेले, हळद-कुंकवाने अलंकृत असे श्रीफल ठेवावे. नंतर कार्यास प्रारंभ करावा. कार्य झाल्यानंतर ते श्रीफल फोडून चांगले असल्यास प्रसाद करावा. (गोड पदार्थ करावा. आमटी–भाजीत खोबरे घालू नये) तो आपल्या घरांतील मंडळींनाच द्यावा. उगाच आल्यागेल्याला वाटत बसू नये. श्रीफल खराब झाले असल्यास लांबून पाण्यात (विहीर, नदी, ओढा, समुद्राच्या पाण्यांत) सोडावे. पाण्यात शिरून ते पाण्यात सोडू नये. आपल्या पीडा, अमानवी शक्तीचा त्रास त्या श्रीफलाबरोबर असतो, ह्याचे भान ठेवावे.

★ ★ ★





श्रीसत्यनारायणादि पुजा, अनुष्ठान सांगता, होम–हवन, लग्न, व्रतबंध आदि मंगलकार्य समयी आपल्या घरात, जरुर तर कार्यस्थळी, स्वयंपाक घरांत, किचन प्लॅटफॉर्मवर (ओट्यावर) आपल्या डाव्या हाताला म्हणजेच श्रीअन्नपूर्णेच्या उजव्या हाताला, २ देठाच्या खायच्या पानांचा विडा, सुपारी, दक्षिणेसह (देवीला दीड पटीत दक्षिणा अर्पण करावी. उदा. रु. १.५०, रु. ३ वगैरे) ठेवावा. गृहस्वामिनींने सकाळी स्नानोत्तर सर्वप्रथम हे काम करावे व मग गॅस, स्टोव्ह, शेगडी प्रज्वलीत करावी. विड्यावर गंधफूल वहावे. त्या समोर दूध–साखरेचा नैवेद्य अर्पण करावा. नंतर प्रसाद म्हणून तो सर्वांनी घ्यावा. प्रार्थना करावी. 'आई, श्रीअन्नपूर्णे ये. आजचे आमच्या घरांतील ........ हे मंगलकार्य तू स्वत: उपस्थित राहून निर्विघ्न, समृद्ध, संपन्न, मंगलमय, आनंदमय, सात्विकपणे करवून घे. सर्वार्थाने यश दे.' रात्रौ कार्य संपन्न झाल्यावर विड्यासमोर दूध-भाताचा नैवेद्य अर्पण करून सर्वांनी तो प्रसाद म्हणून घ्यावा. 'आजच्या कार्यात तुला खूप कष्ट पडले. आता तू स्वस्थानीं जा. विश्रांति घे. तेथून आमच्यावर कृपा ठेव.' असं म्हणून तो विडा हलवावा. दुसरे दिवशी सकाळीं सर्वप्रथम आपल्या घरात येणाऱ्या व्यक्तिला तो अर्पण करून, त्यानंतर कपभर तरी गरमदूध (साखर घातलेले) त्या व्यक्तिला द्यावे. नमस्कार करावा.

श्रीअन्नपूर्णा–पूजन हे सर्व केल्याने माणसे वाढली तरी कार्यात अन्नपदार्थ कमी पडत नाहीत. तंटेबखेडे न होता कार्य उत्तम पार पडून, थोडेतरी अन्न प्रसाद म्हणून उरते. दररोज गॅस, स्टोव्ह,

शेगडीचे पूजन करून श्रीअन्नपूर्णेचे पूजन करणे अगत्याचे आहे. त्याबाबतचा तपशील स्वतंत्र दिला आहे.

५ पानांचा एक विडा (सुपारी, दक्षिणेसह. दक्षिणा रु. १.२५, रु. ५.२५ वगैरे प्रमाणे) पंचमहाभूतांसाठीहि, श्रीअन्नपूर्णेच्या विड्याच्या बाजूलाच, ठेवावा. कार्याच्या आदि, अंति दुध-साखरेचा नैवेद्य त्यांना अर्पण करावा. ह्या पूजनाने कार्यदिनी सर्व लौकिक सुविधा अनुकूल होतात. (जसे लाईट, पाणी, वहान-व्यवस्था, वारा, पाऊस साहाय्यकारी होणे.)

★ ★ ★

## श्रीअन्नपूर्णेची प्रार्थना

**(विडा अर्पण करून सर्व उपचार केल्यावर करणे)**

हे सर्वमंगला, प्रसन्नवदना, करुणामयी, नित्यतृप्ता श्रीअन्नपूर्णामाते, विनम्र वंदन ! आमच्याकडील* . . . . . मंगलकार्याला तू स्वतः उपस्थित राहून पावन, प्रेरक पाकसिद्धि कर; करवून घे. तुझ्या हाताने सिद्ध केलेले प्रासादिक सर्व पदार्थ सेवन करणाऱ्या सर्वांना सात्विकता, प्रसन्नता, मंगलमयता, आनंदमयता, संपन्नता, सर्वांगीण समृद्धी, श्रीचरणसेवारतवृत्ति लाभू दे. अंगिकृत कार्य सर्वार्थाने निर्विघ्न, समृद्ध, संपन्न होऊ दे. तुझा कीर्तिध्वज अखंडपणे गगनांत डौलाने फडकत राहू दे, ही तुझ्या चरणी आम्ही प्रार्थना करतो. आम्हाला पोटाशी घेऊन आमचेवर कृपा कर. तुझ्या





निरंतर कृपेला पात्र होणारे आचरण आमचेकडून करवून घे.

* येथे मंगलकार्याचा उल्लेख करवा.

## पंचमहाभूतांची प्रार्थना

**(विडा अर्पण करून सर्व उपचार केल्यावर करणे)**

हे, पृथ्वी, आप, तेज, वायु, आकाश पंचमहाभूतांनो, तुम्हाला विनम्र अभिवादन ! आमचेकडील अंगिकृत मंगल कार्य सर्वार्थाने निर्विघ्न, समृद्ध, संपन्न, आनंदमय, मंगलमय, सात्विक, सुंदर होण्यासाठीं आम्हां सर्वांना सर्वार्थाने साहाय्यभूत व्हा. आमचेवर अखंड, अविरत कृपा करा. तुमचे कृपेला पात्र होणारे आचरण आमचेकडून सदैव करवून घ्या. आम्हाला यशवंत, जयवंत, वरदवंत, प्रज्ञावंत, सुसंस्कारित, सक्षम करून श्रीचरणसेवारत करा. ठेवा. आमचा नेहमीच, कृपावंत होऊन, सांभाळ करा. पुन्हा एकवार, विनम्र प्रार्थनेसह अभिवादन !!

★

## पंचमहाभूतांचे स्वागत व पूजन

पृथ्वी, आप, तेज, वायु, आकाश ह्यातूनच आपली निर्मिती. त्यांना विसरून कसे चालेल ?

भाऊबीजेच्या दिवशी घरच्या कर्त्या स्त्रीने आपले बंधूच समजून वरील पाच जणांसाठी स्वतंत्र आसने मांडावीत. प्रत्येक आसनावर दोन देठाची (खावयाची पाने) पाने, सुपारी, दक्षिणायुक्त विडा ठेवावा. ते सर्व स्थानापन्न झाले आहेत असे मानून, मग प्रत्येकाचे गंध, फुले,

हळदकुंकू, अष्टगंध वापरून स्वतंत्रपणे पूजन करावे. त्यांना धूप, दीप ओवाळावेत, प्रत्येकाला स्वतंत्र थाळीत फराळाचे अर्पण करावे. न विसरता प्रत्येकाला पिण्यासाठी पाणी ठेवावे. त्यानंतर द्यावयाचे शीतपेय वा चहा, कॉफीहि ठेवावी.

'आम्हा सर्व कुटुंबियांवर आपली सर्वांची सदैव, अखंड कृपा राहावी. आपण आम्हाला सर्वतोपरी सांभाळावे, साहाय्यभूत व्हावे,' म्हणून प्रार्थना करावी.

आपला भाऊ घरी येऊन भाऊबीज करून मार्गस्थ झाल्यावर, मगच वरील सर्व आसने वगैरे उचलून ठेवावीत. फराळ वगैरे जिन्नस प्रसाद म्हणून घरच्या मंडळींना द्यावेत. हे सर्व करण्यापूर्वी पुन्हा प्रार्थना करावी. 'आता आपण सर्वांनी स्वस्थानीं जावे आणि तेथून आम्हां सर्वांवर अखंड कृपेची पाखर ठेवावी.' (भाऊ नसल्यास दुपारी १२ नंतर आसने वगैरे उचलणे.)

अशा पूजनाने, वस्तूपासून, वहानांपासून, जमीनीपासून, पाण्यापासून, विजेपासून, हवेपासून, अग्नि पासून होणारे नुकसान, अपघात टळतात, हा अनेकांचा अनुभव आहे.

## संकटी रक्षीं . . .

अलिकडेच सुमारे दीड महिन्यापूर्वी काय घडले, ते पहा.

रानडे रोडजवळ, दादर येथील नव्या पोपटलाल चाळीतील घटना. पहाटे ३/३॥ चा सुमार असेल. ह्या कुशीवरून त्या कुशीवर वळत मकरंदने जांभई दिली आणि अंगावर पांघरूण ओढले.





थोड्याच वेळात कुणी तरी चापटी मारून उठवावं, तसा तो पटकन् अंथरुणावर उठून बसला, डोळे चोळले. त्याला कसला तरी चमत्कारिक वास आला. श्वास घेताना त्रास होत असल्याचं जाणवलं. क्षणार्धांत तो स्वयंपाकघराकडे धावला. ओट्याजवळ आला. भराभर त्याने खिडक्या उघडल्या. गॅस खालून बंद करून त्याने रबरी नळी ओढली. धडपडत स्वयंपाकघराचा दरवाजा उघडला. कसा बसा गॅसं सिलेंडर त्याने मागील गॅलेरीत आणून ठेवला. गॅस सतत 'लिक' होत होता. (गॅस गळत होता. सिलेंडरच्या बाहेर येत होता.) त्याच्या धडपडीने आई उठली. 'काय रे चाललंय तुझं मकरंद ?' त्रासिकपणे तिने प्रश्न केला. 'सांगतो,' म्हणून त्याने बाहेरच्या खोलीच्या खिडक्या, दरवाजे उघडले. शेजारच्या खोलीतील दादा, वहिनीहि जागे झाले. त्यांची मुलगी रडू लागली. 'थोडे थांबा, दूध गरम करण्यासाठी काडीहि ओढू नका. घरभर गॅस 'लिक' झाला आहे.' कसंबसं मकरंद म्हणाला. सर्वांच्याच झोपा उडाल्या. मकरंद घाम टिपीत दादाला म्हणाला. 'चल, तो सिलेंडर नेवून खालच्या ग्राऊन्डमध्ये ठेवू या. नाहीतर ..... शेजारच्या जोशीकाकू उठतील पहाटे नेहमीप्रमाणे आणि त्यांचा गॅस लावतील, तेव्हा चाळीची मागची बाजू पेटेल. चल, चल.' दोघांनी मागच्या ग्राऊंड वजा अंगणात सिलेंडर नेवून ठेवला. खुर्चीत बसता बसता मकरंद म्हणाला 'आणखी थोडा वेळ हा गॅस असाच 'लिक' होत राहिला असता तर ?' 'अरे, पण नेहमी गाढ झोपणारा तूं, आज जागा कसा झालास ?' आईने विचारले.

'कुणी उठवलं मला ?' मकरंद स्वत:शीच पुटपुटत होता.

★ ★ ★

## पर्जन्या, त्रिवार वंदन तुला

माझे सद्‌गुरु प.पू. श्रीआबाजी बांदेकर यांच्या मृत्युंजय महारथी शांतीचा (६५ वर्षे पूर्ण) मंगल सोहळा मंगळवार, दिनांक ५ जून १९९० रोजी डोंबिवली (पूर्व) मुक्कामी 'श्री'नी संपन्न करवून घेतला.

सोमवार, दि. ४ जून १९९०ची सकाळ उजाडली. ती सोसाट्याचा वारा, प्रचंड पाऊस यानीच. आम्ही इने–गिने ३–४ जण श्री. रमेश जोशींच्या घरी डोंबिवलीस (पश्चिम) श्रीखंडाचा चक्का फेंसून, साखर घालून ते तयार करण्याच्या खटपटीत होता. खोलीतल्या खोलीत आमचं बोलणं ऐकमेकाना ऐकू येत नव्हत. पावसाचा, वाऱ्याचा जोर वाढतच होता. मुंबई, उपनगरात सर्वत्र हीच अवस्था होती. कोणी तरी म्हणालं, 'आनंदस्वामी, हे असच चालू राहिल, तर उद्या शांती सोहळ्यास माणस कशी येणार ? २२५/२५० माणसांच्या ह्या श्रीखंडाच मग करायच काय ?'

'सार काही सुरळीत होईल हो. 'श्री' आज्ञेनुसार ह्या कार्यक्रमा आयोजन करण्यात आल आहे. आपण आपल्या अकलेन काय केल ह्यात ?' मी म्हणालो.

'ते खर हो, पण .... तुम्ही काही तरी करा. स्वामींना सांगा मीनाताई रानडे म्हणाल्या.





मिस्कीलपणे हंसत सौ. अनघा जोशी सारं काही पहात होत्या.

आमच काम सुरूच होत. काय कराव, म्हणजे सोबतच्या मंडळींचा विश्वास दुणावेल ? मी विचार करू लागलो. उदबत्ती, निरांजन लावून देवांना, पावसाला ओवाळल. श्रीखंड तयार होताच त्यातील पातेलीभर श्रीखंड देवांना अर्पण केल. एका पळसाच्या पानावर थोड श्रीखंड घातल आणि खिडकी बाहेर ते पान पर्जन्यराजासाठी ठेवल.

किंचित् मोठ्याने मी प्रार्थना केली. 'हे पर्जन्यराजा, अनिलासह तू जर असाच धुमाकूळ घालत राहिलास, तर उद्याचा आमचा कार्यक्रम कसा पार पडणार ? सर्वत्र विखुरलेली आम्ही बाळ–गोपाळ मंडळी, एकत्र येऊन श्रीसद्‌गुरु दर्शन, पूजन कस करणार ? किती वस्तूंची नासाडी होईल ? तुम्ही दोघेहि आम्हाला साहाय्यभूत व्हा. आता पुरे. सारं काही निर्विघ्न, समृद्ध, संपन्न करा. प्रसन्न व्हा, ही तुमच्या चरणी विनम्र प्रार्थना.' माझे डोळे भरून आले होते.

सहकारी साधकांना समाधान वाटल.

सायंकाळपासून पाऊस–वारा कमी कमी होत रात्री पूर्ण थांबला.

दुसऱ्या दिवशी पहाटे ५च्या ठोक्याला आम्ही सर्वजण हॉलमध्ये दाखल झालो. डोंबिवलीचे रस्ते कोरडे ठणठणीत झाले होते. ...चे गाड्या सुरळीत ये–जा करीत होत्या. अपेक्षेपेक्षा जास्त मंडळी ...ळ्यास आली. सर्वत्र आनंदाच साम्राज्य पसरल होत. क्षणभर ...च्या बाहेर आलो. श्री. नाना आंबेकर भेटले. 'प्रभुची कृपा आहे. ...ा वाटल नव्हत, आजचा समारंभ पावसामुळे धड होईल असा.

पण कुठेहि पावसाचा मागमूस नाही, आनंदस्वामी.' मी कुठे हरवलो होतो मला माहित नाही. श्रीसद्गुरु कृपेच्या पर्जन्याचे सुखद्, सुगंधी शिंतोडे माझ्या अंगावर उडत होते. अपार कृतज्ञतेने माझ्या डोळ्यांत पाऊस जमा झाला होता. पायाखालची धरित्री त्यांत न्हाहून निघत होती ! कुणी तरी म्हणत होत हळुवारपणे, 'बाळा, झाल ना तुझ्या मनासारख ?'

★ ★ ★

## देवीची ओटी कशी भराल ?

**श्रीदेवीच्या ओटींत अर्पण करावयाच्या वस्तू: श्रीकुलदेवी**

१) दोन श्रीफले (नारळ) २) हळद–कुंकू (स्वतंत्र पुड्या असाव्यात) ३) १ सुपारी ४) १ हळकुंड ५) ५ ओंजळी वा ५ मुठी तांदूळ ६) सोळा हिरव्या बांगड्या ७) रु. १.५० पैसे, दक्षिणा किंवा दीडाच्या पटीतील रक्कम ८) वेणी/गजरा/फूल. काहीहि एक चालेल ९) अत्तराची बाटली १०) पोलक्यासाठीं शक्यतो हिरवे कापड (अन्य चालेल) (**२ नग**) ११) मेंदी १२) मंगलसूत्र १३) जोडवी १४) खडीसाखर वा अन्य गोड पदार्थ १५) पांच (५) फळे, फळांत केळे असावे. १६) घरी तयार केलेला गोड पदार्थ १७) साडी (**[illegible] नग**) १८) आरसा १९) पावडरचा डबा (फेस पावडर) २० काजळाची डबी २१) कंगवा/फणी २२) खोबरेल तेलाची बाटली २३) दागिने/दागिन्यांसाठी शक्य असेल ती रोख रक्कम अर्पण





करावी. २४) उटणे २५) दूध–साखर (पूर्ण अन्न म्हणून अर्पण करावे.)

★ ★ ★

**श्रीकुलदेवास अर्पण करावयाच्या वस्तू :**

१) २ श्रीफले (नारळ) २) पंचा (**२ नग**) / धोतर (**२ नग**) पंचा वा धोतर काहीहि एक चालेल, मात्र त्याचे **२ नग** हवेत.

३) रु. ५.२५/रु. ११.२५ वा अशा पद्धतीची दक्षिणा.

४) खडीसाखर वा अन्य गोड पदार्थ

५) दोन जानवीजोड ६) उगाळलेले चंदन किंवा चंदन पावडर किंवा अष्टगंध.

वस्तू अर्पण करण्यापूर्वी तुपाचे निरांजन (२ वातींचे), उदबत्ती प्रज्वलित करून देवाला/देवीला ओवाळावे. प्रथम उदबत्तीने, नंतर निरांजनाने.

- कुलदेवता कुमारिका असेल तर वेरवल्या (जोडवी), मंगलसूत्र, नथ ऐवजी अन्य दागिने अर्पण करावेत. हिरव्या बांगड्या ८ अर्पण केल्या तरी चालतील. प्रथम देवतेचे पूजन करावे. मग उदबत्ती, निरांजनाने ओवाळावे. दूधसाखरेचा नैवेद्य अर्पण करावा आणि प्रार्थना करावी. 'आई, यथाशक्ति, यथामति तुझी ओटी भरते आहे. मान्य करून घे. मी आणि माझ्या सर्व सासर-माहेरच्या कुटुंबियांवर अखंड कृपा ठेवून वंशोवंशी तुझी सेवा करवून घे.' मग ओटी अर्पण करावी. ब्राह्मण वा गुरवाने

नारळाची अर्धी वाटी दिली तर घेऊ नये. पूर्ण नारळ देण्याबाबत आग्रह धरावा. आपण अर्पण केलेल्या नारळापैकीच नारळ घ्यावा. आपल्या पूर्वी कोणीतरी अर्पण केलेला नारळ नेमका कशासाठी ? हे आपणांस कसे कळावे ?

- भेटीसाठी पायी चालत येणारा फक्त श्रीदेवीला अधिक प्रिय आहे.
- ५, ७, ८ किंवा १६ नारळांचे तोरणहि तिला प्रिय आहे. ते देव्हाऱ्यासमोर, गाभाऱ्यावर अगर मंदिराच्या प्रमुख दरवाज्यावर लावावे.
- पातळ (साडी), धोतर वा पंचा **२ नग** कशासाठी ? आपण स्वत:साठी प्रतिवर्षी २ पातळे. २ धोतरे वा २ पंचे (मोठे) नेसावयासाठी खरेदी करतो. खरं ना ? मग देव, देवी वा सद्गुरूंसाठी, संतमहात्म्यांसाठी **किमान २ नग** (प्रत्येकी) घेणे आवश्यक नाही कां ? सर्वात 'भाव' महत्वाचा. खरं ना ?

★ ★ ★

## घराचा मुख्य दरवाजा कसा उघडावा ?

रात्रौ बंद केलेला दरवाजा कधीहि उघडावयाचा झाल्या आंतील (दरवाजाच्या) कड्याना नमस्कारपूर्वक हळुवार स्पर्श क त्यांच्यांवर तीन वेळा थोडे पाणी शिंपडावे. जसें कुटुंबातील '**ब** लोकांना' जागे करताना आपण त्यांच्या डोळ्यांना लावतो, न म्हणावे, 'नमस्कार, रात्रभर आम्हाला सांभाळल्याबद्दल, धन्यव





त्यानंतर दरवाजा उघडून घराच्या उंबरठ्याजवळ उभे राहून (आतील बाजूस) घराबाहेर तीन वेळा पाणी शिंपडावे आणि त्यानंतर घराबाहेर उजवा पाय टाकावा.

उंबरठ्याबाहेर (उंबरठा असल्यास) रात्रौ निरनिराळ्या उपद्रवकारक शक्ति संचार करीत असतात. जलसिंचनाने त्या सजग होऊन मार्गस्थ होतात, असा अनुभव आहे.

तुम्ही हे सारे करून पहा ना !

★

## घराचा मुख्य दरवाजा कसा बंद करावा ?

छोट्या अगर मोठ्या घराच्या (ब्लॉकच्या) दरवाजाला एक चौकट **अ**सते. त्याच्या आधारावर त्या घराचा एकसंध वा दोन भागांत **उघड**णारा दरवाजा उभा असतो.

लाकडी चौकटीचा वरचा भाग, दोन्ही बाजूला असलेल्या उभ्या **बट** लाकडाच्या पट्ट्यांना सावरतो. तळांत उंबरठा त्यांना आधार **तो**. (ज्यांच्या घरांना उंबरठे नसतील त्यांनी आवर्जून लावून **ावेत**.)

**दोन** बाजूच्या लाकडी पट्ट्या हे त्या घराचे राखणदार '**जय**', **जय**' आहेत. रात्रौ झोपता, घरांत आंतील भागात, उभ राहून, त्या **ना हात** लावून सावध कराव. नमस्कार करून म्हणाव, 'सदैव **राहून** 'जय–विजय' तुम्ही दोघांनी ह्या घराचे रक्षण करा. बरं

किमान एक वेळ श्रद्धेने खालील श्लोक म्हणावा.

**'रक्ष, रक्ष प्रभो, आम्हां । यश 'जय', 'विजया' देवूनी ।**
**तूंच सांभाळी सान–थोरा । पूर्ण कृपादान ओपूनी ॥'**

नंतर घराच्या–दरवाजाच्या कड्या लावाव्यात. त्यानाहि नमस्कार करून 'सदैव सज्ज राहून सर्वार्थाने घर सांभाळा.' म्हणाव. शांतपणे झोपी जाव.

(येथे एक महत्त्वाची गोष्ट कुटुंबप्रमुख (पुरुष अगर स्त्रीने) व्यक्तीने ध्यानात ठेवली पाहिजे, ती ही की ज्याच्या दरवाजात 'जय', 'विजय' आहेत, त्यांचं आंतील घर **'वैकुंठा'** सारखं प्रेमळ, पावन, प्रेरक, प्रतापी, शांत, मंगलमय, आनंदमय, समर्थ, सात्विक, सुंदर, सर्वार्थाने समृद्ध, संपन्न, सुसंस्कारित, क्षमाशील, श्रीचरणसेवारत, सश्रद्ध असले पाहजे.)

वरील पद्धतीने सश्रद्ध मनाने, दरवाजा बंद करावा. श्रीविष्णू, जय–विजयाच्या साहाय्याने ते घर सांभाळतात, असा आमचा ६० वर्षांपेक्षा अधिक कालाचा अनुभव आहे. आपणहि हा अनुभव घेणार का ?

★

## घरांतून कसे बाहेर पडाल ?

श्रीकुलदेव, कुलदेवता, माता–पिता (घरी विद्यमान असल्यास प्रत्यक्ष चरण वंदन करून) गुरुजन, उपास्य देवता आदिना मनोमन वंदन करून म्हणावं, 'स्वामी, माझ्याबरोबर कामाला चला.' (कुणी





साईबाबा, गजाननमहाराज, जगदंबे, मोरया आदिंची नावे घेतील.) ते आपल्याबरोबर आहेतच अशी मनोमन खात्री बाळगून सर्वप्रथम उजवा पाय घरच्या उंबरठ्याबाहेर टाकावा. तोंडाने खालील श्लोक श्रद्धा–भक्तियुक्त अंत:करणाने म्हणावेत.

१) **'आपदामपहर्तारं दातारं सर्वसंपदाम् ।**
**लोकाभिरामं श्रीरामं भूयो भूयो नमाम्यहम् ॥'**

(श्रीरामरक्षा श्लोक ३५वा)

हा श्लोक किमान ३ वेळा (३ हा अंक गुरु ग्रहाचा आहे. गुरु म्हणजे सात्विकता, मांगल्य, ज्ञान, वैराग्य) म्हणावा.

आपत्तींचा नाश करणाऱ्या, सर्वप्रकारची संपत्ती देणाऱ्या, लोकांना आनंद देणाऱ्या श्रीरामाला मी वारंवार नमस्कार करतो.

२) **'आत्तसज्यधनुषाविषुस्पृशा वक्षयाशुगनिषङ्गसङ्गिनौ ।**
**रक्षणाय मम रामलक्ष्मणावग्रत:पथि सदैव गच्छताम् ॥२०॥'**

(श्रीरामरक्षा श्लोक २०वा)

सज्ज धनुष्यबाण हाती धरणारे, अक्षय्य बाणांचे भाते बाळगणारे राम–लक्ष्मण माझ्या रक्षणाकरिता मार्गात नेहमी माझ्यापुढे चालोत. हा श्लोक किमान १ वेळ म्हणावा. (१ हा अंक रवि ग्रहाचा आहे. म्हणजे तेज, पराक्रम, सर्वांगीण सुचिता.)

) **'संनद्ध: कवची खड्गी चापबाणधरो युवा ।**
**गच्छन् मनोरथोऽस्माकं राम: पातु सलक्ष्मण: ॥'**

(श्रीरामरक्षा श्लोक २१)

निरंतर सज्ज असलेला, अंगात कवच धारण करणारा, हाती खड्ग आणि धनुष्यबाण धारण करणारा, लक्ष्मणासह गमन करणारा – आमचा मूर्तिमंत मनोरथ–श्रीराम आमचे रक्षण करो.

हा श्लोक किमान १ वेळा म्हणावा. घरी परतल्यावर म्हणावें, 'रामराया / स्वामी, दमलात, आता विश्रांति घ्या.'

वर्षभर असं करून श्रीराम कसं सांभाळतो ते पहा.

कांही ठिकाणी घरातून बाहेर पडताना श्रीगणेशकवच, श्रीदत्तकवच, श्रीशिव, श्रीदेवी, श्रीमारुती आदि कवच म्हणण्याचीहि पद्धत आहे.

घर सोडताना काही मंडळी खालील श्लोक ३ वेळा म्हणतात.

**'आपदामपहर्तारं दातारं सुख संपदाम् ।**
**क्षीप्रं, गजाननं देवं भूयो भूयो नमाम्यहम् ॥'**

आपत्तीचा नाश करणाऱ्या, त्वरित सर्व प्रकारची सुख, संपदा देणाऱ्या श्रीगजानन देवाला मी वारंवार नमस्कार करतो.



## अन्नाचा सन्मान करायला शिकू या

विजयने बुटाचे बंद बांधले. निघताना तो म्हणाला, 'मावशी येतो ग.'

'जेवायचं राहू दे रे, पण थोडे दूध–पोहे तरी खावून छबूमावशी बाहेर येत म्हणाल्या.





विजयने बॅग उचलली आणि 'नको, नको' म्हणत तो बाहेर पडला. मी पुढे झालो. काही तरी बोलावं असं सारखं वाटत होत, पण मी स्वत:ला सावरलं. थोडा खिन्न झालो.

रात्री ९च्या सुमारास थकला भागलेला विजय परत आला. तो उत्तम सेल्समन खरा, पण आज त्याचं म्हणण्यासारखं काम झालं नव्हतं, हे त्याचा चेहराच बोलत होता.

आंघोळ करून तो जेवायला बसला. 'काय रे विजय, काम झालं ?' छबूमावशी त्याला पोळी वाढत विचारत होत्या. ' काय सांगू मावशी ? सबंध दिवसात एकहि काम धड झालं नाही. उरण भागात खायलाहि काही मिळालं नाही. २/३ कप कळकट चहा प्यायलो तेव्हढाच.'

'अरे, रोज असं काम केलस, तर कसं होणार तुझं ?' काळजीच्या सुरात मावशी म्हणाल्या.

आता मला राहावलं नाही. मी पटकन् म्हणालो. 'ह्याला तुम्ही रणीभूत आहात, मावशी.'

'मी ? मी काय केलं, स्वामी ?'

'मावशी रागावू नका, पण एक लक्षात ठेवा. बाहेर जाणाऱ्या साला **'खाण्याची नाट'** लावून कधी जाऊ द्यायचं नाही. निघता ा 'बाबा, हे खा. ते खा' म्हणू नये. तो घाईत असतो. 'नको, म्हणतो. अन्नाचा अवमान करतो आणि दिवसभर त्याची कामं ाहीत. तो समाधानाने गोळाभर सुग्रास अन्न खावू शकत

'बऱ्याच ठिकाणी असच घडत. मग काय करायच ?' विजय मला विचारत होता.

'चिमुटभर साखर, गुळाचा खडा, ४ भुईमुगाचे दाणे आपण मागून घ्यावेत, नाहीतर घोटभर पाणी प्यावे आणि मार्गस्थ व्हावे.' दिवसभराचा/रात्रीचा प्रवास सुखाचा होतो. कामंहि उत्तम तऱ्हेने पार पडतात.'

'कशावरून ?'

'माझा गेल्या ४० वर्षांचा हा अनुभव आहे. अनेकांचा अनुभ आहे. आपण दिवस–रात्र काम का करतो, विजय ? पोटासाठी. पुढ्यात येणारे अन्नच नाकारून आपणाला यश कसे मिळेल आपण सदैव कृतज्ञ असल पाहिजे. विनम्र असल पाहिजे.'

'आपल्या रोजच्या जीवनात अध्यात्म कस मुरल, जिरल आ नाही ?' मावशी उत्साहाने म्हणाल्या.

'तेच बघायला शिकल पाहिजे.'

'नव्हे, नव्हे जगायला शिकलं पाहिजे ! काय मावशी, चहा दे ना ह्या मुद्यावर ?' विजय खळाळून हसत म्हणाला.

'तुला मेल्या, प्रत्येक गोष्टीत हवा असतो चहा.' मावशी खो रागाने म्हणाल्या.

'मलाहि चालेल, बरं चहा; आलं घातलेला.' मी प म्हणालो.

आम्ही सर्व खळाळून हसलो. मावशी स्वयंपाकघराकडे वळ







## आपल्या वागण्यात 'भाव' हवा

'हल्ली मॅचिंगच फॅड आहे, आनंदस्वामी, म्हणून तर मी ब्लाऊज पीस न देता छानशी प्लॅस्टिकची पिशवी सरलाला दिली; आता ती अभयच्या लग्नाचं आमंत्रण करायला आली होती तेव्हा.' अनुवहिनी ठसक्यात मला म्हणाल्या.

'आणि सरलाच्या यजमानाना काय दिलत ?'

'पुरुषाना कशाला द्यायला पाहिजे ?'

'का ? तुम्ही त्याला काही दिलं असतं, तर ते त्याला बोचल असत ?'

'स्वामी, तुम्ही अगदी टोकाची भूमिका . . .'

'ऐका, ऐका अनुवहिनी, पूर्वी पुरुषाला सुपारी किंवा श्रीफल देत असत. आठवत का ?'

'न आठवायला काय झाल ?'

'म्हटल, त्यातहि तुम्ही काही नवा पायंडा पाडू शकता. अर्थात कलाच सर्वांगीण वैभव, शान त्याला येऊ शकणार नाही.'

'काय करायला हव होत ?'

ाघांच्या हाताना अत्तर लावून, वस्तूला हळद–कुंकवाने सालंकृत प्रभाकरला तुम्ही हातरुमाल देऊ शकला असता, छोटस बॉलपेनहि चालल असत. सरलाला हळद-कुंकू लावून . . .' ावी द्यायला हवी होती, असंच ना ? टिकली लावणाऱ्याना ळद-कुंकू ?'

'आपण लावावं ! पिशवी तुम्ही रिकामीच दिली असेल.'

'म्हणजे ?'

'अशी रिकामी पिशवी, पर्स, पैशाचं पाकिट कुणाला देऊ नये, अनुवहिनी. पिशवीत ओंजळभर तांदूळ अगर मूठभर साखर घालावी. पुरुषाच्या पाकिटात किमान सव्वा रुपया तरी घालावा. बाईला पाकिट, पर्स देताना, देवीस्वरूप समजून, दीड रुपया तरी घालावा. (देवीला दीडपट दिलं की ती तीनपट देते, ही श्रद्धा आहे.) कशासाठी ? विचाराना, मला.'

'सांगाना'.

'कलियुगाची लक्ष्मी म्हणजे तांदूळ. साखर ही मधुरता मांगल्याचं प्रतीक. सव्वा रुपया हे समृद्धि, संपन्नतेच शुभचिन्ह देताना भावपूर्ण, मनापासून शुभेच्छापूर्वक द्याव. वस्तू वापरू संपते. भाव शिल्लक रहतो. नव्हे, नव्हे. तो प्रेमाच, जिव्हाळ्या नातं निर्माण करतो. असाच दिव्याने दिवा लागत रहातो !

★ ★ ★

## घरांत शिरल्यावर दर्शनी भागांत काय दिसावं

घरात शिरता शिरता गोविंदराव एकदम थबकले, 'व्वा, अ सुंदर आहे हा गणपति ! कुठून आणलात, सदुभाऊ ?' उत्तरादा सदुभाऊ प्रसन्न हंसले. 'बसा, मी आलोच हं,' असं म् स्वयंपाकघराकडे वळले. गोविंदराव व त्यांच्याबरोबर आ त्याचा भाचा विवेक कोचावर बसले. सदुभाऊंनी थंडगार पा





ग्लासेस आणून टी पॉयवर ठेवले. 'काय म्हणत होतो रे मी विवेक ? हा गणपति पाहिला नी मी मूळ विषयच विसरलो, बघ.' गोविंदराव हंसत म्हणाले.

'आठवेल, आठवेल तुम्हाला तुमचा विषय. गोविंदराव दर्शनी भागात हा सर्वांगसुंदर गणपति लावण्याचा मूळ हेतू तोच आहे.' सदुभाऊ म्हणाले. 'म्हणजे ?' विवेक आश्चर्याने म्हणाला. 'त्याचं अस आहे, ह्या घरांत अगर कोणाच्याहि घरांत येणारी मंडळी चांगले अगर वाईट विचार बरोबर घेऊन येतात. ते विचार घरांत शिरतानाच थांबावेत. अगदी कोऱ्या पाटीसारख्या स्वच्छ अवस्थेत ते येथे स्थानापन्न होणे अगत्याचे, खरं ना ? वाईट विचारांची, वाममार्गी उपायांची तीव्रता मंगल दर्शनाने नक्की कमी होते. हा आमचा अनुभव आहे. ह्यासाठी आपले पूर्वज घरच्या दर्शनी भागांत, देवादिकांचे मोठे फोटो लावीत असत.'

'त्यासाठी श्रीगणेशाचाच फोटो लावला पाहिजे कां ?' विवेक म्हणाला.

'असंच नाही. श्रीमंगलमूर्तिऐवजी तुम्ही तुम्हाला आवडेल त्या देवाचा, संत, महात्म्याचा फोटो लावू शकता, मात्र तो अतिशय खणा असावा. श्रीविघ्नराजाचा फोटो पूर्वेकडे तोंड करून वा रेकडे तोंड करून लावण्याची प्रथा आहे.'

'ज्यांच्या घराचा दर्शनी भाग दक्षिण दिशेस येतो, त्यांनी काय वे ?' विवेकने प्रश्न केला.

'फार सुंदर प्रश्न विचारलास, विवेक. त्याने **वीर मारुतीचा** उत्तम लावावा. अन्य कोणत्याहि देवाचा, संताचा, महात्म्याचा

फोटो दक्षिणेकडे तोंड करून लावू नये. ज्याला श्रीहनुमंताचा फोटो लावायचा नसेल तर पर्याय म्हणून (थोड्या प्रमाणांत) अतिशय देखणे, दुर्मिळ निसर्गचित्र लावावे.' सदुभाऊंनी उत्साहाने उत्तर दिले.

'उत्तर दिशा . . . . . .'

'सांगतो. उत्तर दिशा ही सिद्धांची दिशा, कुबेराची दिशा म्हणून ओळखली जाते. घरांत दक्षिणेकडे तोंड करून देवांचे कॅलेंडर, फोटो, स्टिकर्स लावू नयेत. घरच्या देवांचे (देव्हाऱ्याचे) तोंडहि दक्षिण दिशेकडे असू नये. घरच्या मंडळींच्या जीवनांतील स्वास्थ, समाधान, सुख अशाने नाहिसे झाल्याचा अनेकांना अनुभव आला आहे. वीर मारुती (दास मारुती नव्हे !) संकटे थोपवितो. त्यांचा यशस्वीपणे मुकाबला करतो. सीताशुद्धिनंतर अयोध्येस परतल्यावर 'हे, महाबाहो, लंकेवर नीट लक्ष ठेव बरं,' असं श्रीरामांनी अंजनेयाला सांगितलं असाव. श्रीरामेश्वर आदि भागांत दक्षिणमुखी उभ्या वीर हनुमंताची भव्य मंदिरे आहेत, त्याच रहस्य तर हे नसेल ना ?'

'बरंय, सदुभाऊ. निघतो. पुन्हा येईन माझ्या कामासाठी.' गोविंदराव म्हणाले

'तुमचा मघाचा विषय ......' सदुभाऊ पुटपुटले.

'आठवला, बरं. त्यावर पुन्हा केव्हां तरी . . . . . .'

'थांबा, भाऊजी. हा चहा तरी घेऊन चला.' सौ. शुभदा चहा कप टी पॉयवर ठेवीत म्हणाली.

'अवश्य,' म्हणत सर्वांनी चहाचे कप उचलले.



॥ श्रीगुरुःशरणम् ॥

## श्रीशंकराचं दर्शन . . .

श्रीशिवशंकर नंदीवर बसतात. ते त्यांचे वहान आहे. नंदी हे धर्माचं प्रतीक आहे. लिंग–शंकर हे ज्योतीस्वरूप ज्ञानाचं शुभचिन्ह मानतात. म्हणजेच ज्ञान हे धर्माधिष्टित हवे. श्रीशंकराचे मंदिरात दर्शन घेण्याची आपल्याकडे एक रूढ पद्धत आहे. नंदीला स्पर्श केल्यावर मग श्रीशंकराकडे जाता येते. डाव्या हाताचा अंगठा आणि करंगळी नंदीच्या शिंगावर ठेवून, उजव्या हाताने त्याच्या वृषणाला हात लावून थोडे वाकून डाव्या हाताच्या फटीतून श्रीशिवाचं दर्शन घ्यायचं असतं. क्रोध आणि काम जिंकल्याशिवाय वैराग्याचं दर्शनहि होणार नाही, अशी त्यांत सूचना आहे. आपल्या पूर्वजांची ही मार्मिकता वाखाणण्यासारखी नाही कां ?

★ ★ ★

## ॐ नमः शिवाय ।

संकल्पपूर्वक हा जप नित्यविधी म्हणून सकाळी करावा.

कामनेसाठी मध्याह्नी करावा.

चित्तशुद्धिसाठी सायंकाळी करावा.

शांतिसाठी रात्री केला पाहिजे.

जपामुळे (कोणत्याहि) माणसाची आत्मिकशक्ति वाढते.

★ ★ ★

## घरांतले देव कसे असावेत ?

'आनंदस्वामी, काही तरीच काय. उभा आणि बसलेल्या गणपतीत फरक कसला ? गणपति तो गणपति.'

'वसंतराव, उभ्या, बटू गणपतीने महापराक्रमी, परमशिवभक्त लंकापति रावणाला अक्षरशः नाचवलं आणि गोकर्णक्षेत्रांत श्रीशिवाच आत्मलिंग स्थापलं, आठवत का ? उभा गणपति भक्ताला उभा ठेवतो. नाचणारा प्रसंगी नाचवतो, म्हणून गृहस्थाच्या घरांत वरदहस्त असलेला, डाव्या हाताने मोदक मागणारा किंवा डाव्या हाती मोदक असलेला, लंबोदर, हाती भक्त रक्षणासाठी अंकुश धारण करणारा, कमळ हाती घेऊन सुस्मित वदनाने भक्तांचे शुभ चिंतणारा, वरदहस्त, नित्यतृप्त, आसनस्थ, श्रीमंगलमूर्ति (शक्य तर ऋद्धि, सिद्धि, लक्ष, लाभासह) हवा.'

'अरे, वा.'

'घरांत एक तरी, सदैव सिद्ध असलेला, वीर हनुमंत असावा. तो दक्षिणेकडे तोंड करून लावावा. सर्वसंकटांशी मुकाबला करून तो भक्तरक्षण करतो. श्रीरामांबरोबरचा श्रीमारुती हा उत्तम दास्य भक्ती शिकवतो. पराक्रमी, तेजस्वी, प्रतापी, महाबुद्धिवान, अत्यंत चपळ, मातृभक्त हनुमान समर्पणभावाने श्रीरामप्रभूंच्या चरणी सेवारत झाला. पराक्रमी पुरुषालाच क्षमाशीलता शोभून दिसते तसे [illegible] आहे.

'घरांतील शिवपिंडी कशी ठेवावी ?'





'वसंतराव नामी प्रश्न विचारलात. शाळुंका दक्षिणेकडे आणि चिंचोळा भाग उत्तरेकडे असावा. त्यावर अविरत रुद्र–पवमान–सुक्त युक्त अभिषेक धार पडू लागली की त्यांतून एक ध्वनिकंपनाचं, विद्युत् लहरींच वलय निर्माण होत. ते लाभदायक, आनंदवर्धक, उत्साहवर्धक, आरोग्यवर्धक असत असा अनेकांचा अनुभव आहे.

'आनंदस्वामी, हल्ली पुरोहित–भटजी–मिळतात कुठें ? मग अभिषेकाला रुद्राची कॅसेट लावली तर ?' वसंतराव अधिक चौकसपणे म्हणाले.

'काहीहि न करण्यापेक्षा कॅसेट बरी, पण आपद्धर्म म्हणून ठीक आहे. कोणत्या अवस्थेत, चिंतेत, चिंतनात, आशाळभूतपणे भटजीबुवांनी रुद्र म्हटला असेल हे कसे कळावे ?'

'म्हणजे ?'

'व्यक्तिसमोर, ठेवून, यजमानाच्या वा अन्य कोणाच्या आर्युःआरोग्य ऐश्वर्य अभिवृद्धिसाठी, क्षेम–कल्याणासाठी म्हटला जाणारा रुद्र संकल्पपूर्वक, नव्हे, नव्हे शुभसंकल्पपूर्वक असतो, म्हणून त्यायोगे शुभफल प्राप्ती होणे शक्य आहे. कॅसेट वाजवून हे कसे साधणार ?'

'स्वामी, हा बारकावा निश्चित विचार करण्यासारखा आहे. घरांतल्या अन्य देवांबाबत काय ?'

'लग्नांत नववधू बरोबर सासरी देण्यात येणारी श्रीअन्नपूर्णेची किंवा श्रीबाळकृष्ण, श्रीमंगलमूर्तिंची मूर्ति बाजारांतून आणून [illegible]शीच कोरी करकरीत दिली जाते, वसंतराव.'

'अहो, मग ती कशी द्यायला पाहिजे ?'

'ज्यांच्या घरांत ती नववधू जाणार आहे, त्याचं सर्वांच संकल्पपूर्वक शुभचिंतन करून, श्रीअन्नपूर्णेवर श्रीसुक्त वा श्रीदेवीसूक्ताची १६ आवर्तने करून, श्रीमंगलमूर्तिंवर श्रीगणपति-अथर्वशीर्ष वा श्रीब्रह्मणस्पति सूक्ताची २१ आवर्तने करून, श्रीबाळकृष्णावर पंचसूक्त अभिषेक करून, मगच त्या मूर्तींची पाठवणी करणे इष्ट. सकल समृद्धि, संपन्नता, मंगलमयता, धन, धान्य, आरोग्य, आनंद, वैभव, सुसंस्कार, मंगल–चारित्र्य आदिसह श्रीअन्नपूर्णा, श्रीमंगलमूर्ति सासरी जावोत, म्हणजे आपली कन्या, बहीण, भाची सोनपावलाने सासरी जावी, रहावी, नांदावी, ही मंगल कामना ह्या सर्वांमागे आहे, वसंतराव.'

'स्वामी, मग लंगडा बाळकृष्ण कशासाठी ?' वसंतरावांनी मार्मिक प्रश्न विचारला.

मी हंसत हंसत म्हणालो. 'पुढील आयुष्यात वराचं–जावयाचं पाऊल वाकडं पडूं नये म्हणून !'

'तें पडल तर संसार कलंडेल. त्याचा ताल, तोल जाईल आणि तोंडघशी पडाव लागेल. आणखी दुसरा हेतू असा, गोजिरवाणं लडिवाळ, खोडसाळ, मनमोहक रांगणारा बाळ घरी लवकर लवकर यावा म्हणून !'

'स्वामी, कमाल आहे आपल्या पूर्वजांची.' वसंतराव भारा म्हणाले.

'वसंतराव, करणाऱ्याला खूप करण्यासारख आहे. दे





नर्मद्यागणपति किंवा श्रीगणेशमूर्ति असेल, तर ती देवांत साधारणपणे केंद्रभागी ठेवावी. त्याला झाडावर जस फूल, फळ येत, तस ते अर्पण कराव. फुलांचा देठ, दुर्वांची देठं त्याच्या डोयीवर यावीत. श्रीबाळकृष्ण, श्रीविष्णूमूर्ति असेल तर मूर्तिच्या डाव्या हाताला श्रीदेवीची मूर्ति ठेवावी. दुर्वा, तुलसीपत्र, बेल, फूलांनी मूर्ति पूर्णपणे झांकून टाकू नये. देवालाहि श्वासोच्छ्वास घ्यायला जागा ठेवणे इष्ट. साखर न विरघळलेल, कडकडीत गरम दूध, नैवेद्यासाठी ठेवू नये. ठेवायचय झाल्यास वाटीतील गार पाण्यात, गरम दूध-साखरेची वाटी ठेवून, ती चटकन निवेल अशी व्यवस्था करावी. न विसरता देवांना सकाळ, संध्याकाळ दूध–साखरेचा नैवेद्य अर्पण करावा. दूध–साखर हे पूर्णअन्न आहे. सोबत पिण्याच्या पाण्याचाहि छोटा पेला, पाणी भरून ठेवावा. माणसाला चहा देताना आठवणीने आपण पाण्याचा ग्लास देतो तसा !'

'आणखी काय ?'

'देव पुसायची आणि देव्हारा पुसायची वस्त्रं, देवांची उपकरणी, ाच्या हळद–कुंकवाच्या वाट्या, स्वतंत्र असाव्यात. त्या वस्तू सारात इतरत्र वापरू नयेत. जेवताना देवांना भोजन समर्पण न, नैवेद्य अर्पण करून, मगच जेवावे. सामान्यपणे ज्या ज्या ी आपण आपल्या देहासाठी करतो. त्या त्या ईश्वर चरणी अर्पण न मगच त्याचा आस्वाद घ्यावा.'

न्यवाद, स्वामी !' वसंतराव प्रसन्नपणे म्हणाले.

★ ★ ★

## रांगोळी सेवा

दैनंदिन प्रभुसेवा अनेकविध मार्गांनी करता येते. कोणी पूजेची-देवांची भांडी घासूनपुसून लख्ख ठेवण्याची सेवा करतो. कोणी प्रभुची नित्याची वस्त्रे धूतो. कोणी सुंदर, सुगंधी फुलं, आगरबत्ती-अत्तर आणून देतो. कोणी प्रभुसमोर उत्तम रांगोळी काढून त्याचा दरबार सजवतो.

रांगोळी सेवा दिसते सोपी पण आहे मात्र कठीण. काही ठिकाणी गाईच्या शेणाने जागा सारवून, स्वच्छ करून, सुकल्यावर रांगोळी रेखाटावी लागते. श्रीक्षेत्र गाणगापूर आणि श्रीक्षेत्र नृसिंहवाडी (नरसोबाची वाडी) येथे अगदी पहाटे स्नानादि नित्यकर्मे उरकून १/२ स्त्रिया ही सेवा करताना आढळतात. एकदा रेखलेली रेघ त्यांनी कधी पुसल्याचे मी पाहिले नाही. इतक्या एकाग्रपणे झपाझप हे काम सुरु असते की, आजूबाजूला कोणी उभ आहे ह्याच भानहि त्यांना नसत. श्रीस्वामीमहाराज जागे होण्याआधी त्यांचा दरबार सज्ज असला पाहिजे, ही एकच ओढ त्या माऊलींना लागलेली असते. सूर्य, चंद्र, गोपद्मे, शंख, चक्र, गदा, पद्म, परशु, स्वस्तिक, कमळ, अंकुश आदि विविध तऱ्हेच्या गोष्टींचा समावेश रांगोळीत असतो. अत्यंत रेखीव, कलाकुसरयुक्त रेखाटण सुरु असत. ही सेवा वर्षानुवर्षे सुरु आहे, अगदी नियमितपणे.

घरांतील देवांसमोर, घराच्या प्रमुख उंबरठ्यावर रांगोळी रेखाटण हा आपला पूर्वापार चालत आलेला एक महत्वाचा उपचार आ[...] आता नवीन घरबांधणीत उंबरठ्यानाच रजा देण्यात आलेली आ[...] आवर्जून सांगितल्याशिवाय घरांना उंबरठाच घालत नाहीत. रांगो[...]





घालताना पूर्वी विविध स्तोत्रे म्हणण्याचा प्रघात होता. घरच्या कर्त्या स्त्रीकडे हे काम असे.

अत्यल्प प्रमाणात आजहि शहरांत काही कुटुंबात देवांसमोर रांगोळी घातली जाते.

रांगोळीत गोपद्मे, श्रीयंत्र, ज्ञानकमळ, स्वस्तिक, संचित श्रीगणेश, हत्ती, सूर्य, गरुड, कमळ, ध्वज, सवत्स–धेनू आदि मंगल चिन्हे सहेतूक काढण्यांत येतात.

दूध, दुभतं घरांत विपुल असावं, सर्वत्र मंगलमय वातावरण नांदाव, म्हणून गोपद्मे, सवत्स–धेनूचं रेखाटण. विशालता, भव्यता, विपुल सामर्थ्य, अफाट बुद्धिमत्ता, सर्वांगीण वैभवाच पूजन हत्तीच्या माध्यमांतून केल जात. चाणाक्षपणा, बुद्धिमत्ता, शक्तिसंचय, अचुकपणा, स्वामीनिष्ठा, सेवा ह्याचं गरुड हे प्रतीक आहे. कलंकरहित, सामर्थ्यसंपन्न, प्रकाशमय, प्रज्ञायुक्त जीवन, स्वच्छता, भव्यता, उदारता आदि गुणांचे वर्धन व्हावे हे सूर्य पूजन शिकवतं. सारी मंगल चिन्हे, यंत्रे, मंगलमयता, आनंदमयता, वैभव, ज्ञान, सद्गुण, निष्कलंक, प्रेरक, चारित्र्यप्राप्ती, सात्विकतावृद्धि, शीलसंवर्धन आदि गुणांचा संदेश देत असतात. डोळसपणान केलेले त्यांचे रेखाटण, पूजन, चिंतन हा संस्कार जरुर घडवू शकत. सुसंस्कार हे अक्षय्य धन आहे. रांगोळीची योजना त्यासाठी आहे. घरच्या कर्त्या स्त्रीला ह्याची जाण आली पाहिजे. कारण ..... खरे सुसंस्कार तिच्याकडूनच घडू शकतात; म्हणून म्हटलं आहे. . . . .

**'या देवी सर्वभूतेषु मातृरूपेण संस्थिता ।**
**नमस्तस्यै नमस्तस्यै नमस्तस्यै नमो नम: ॥'**

★

## सदा सर्वदा देव सन्नीध आहे ।

मी किंचित् विचारात पडलो. काय उपाय सांगावा, साने मामींना ?

'डॉक्टर झाले, वैद्य झाले, सागरचे महशूर हकीम कादरबक्ष ह्यांचेहि औषध घेऊन झाले. तात्पुरता आराम पडतो. पुन्हा येरे माझ्या मागल्या. पाय फुटतात. अगदी चारहि बाजूने. बोटे सुजतात. थंडीत तर सतत रक्तच येत रहात त्यांतून. स्वामी, तुम्हीच यातून मार्ग काढा. पोरगी लग्नाची आहे, हो.' असं सांगताना त्यांच्या डोळ्यांत टचकन् पाणी आलं. सानेमामी पुन्हा पुन्हा मला तेच सांगत होत्या.

मी मनस्वी हेलावलो. श्रीस्वामी समर्थांना प्रार्थना केली. संकल्पपूर्वक प. प. श्रीवासुदेवानंद सरस्वती (टेंब्ये) स्वामी-महाराजांच्या एका सिद्ध स्तोत्रांतील २ ओळी लिहून दिल्या.

**'दद्रुस्फोटककुष्ठादि महामारी विषूचिका ।**
**नश्यंत्यन्येऽपि रोगाश्च दत्तात्रेयं नमामि तम् ॥'**

'नेहमींचे सर्व उपचार करून, संकल्पपूर्वक, दररोज १०८ वेळ ह्या स्तोत्राच्या दोन ओळी तुमच्या प्रभाला म्हणायला सांगा. उपासना करताना प्रभु आपले पाय निश्चित पूर्ण बरे करणार, विचार मनांत ठेवावयास सांगा. ह्या ओळी म्हणत असताना सत उदबत्ती प्रज्वलित ठेवा. त्याची विभूति स्वच्छ करून दररोज र मधांतून निजतेवेळी पायांना लावण्यास सांगा. सकाळी स्नाना वेळी कोंबट पाण्याने पाय धुवावेत.





ही उपासना किमान ४ महिने करा. नंतर कळवा मला सवडीने.' सानेमामी आनंदाने मार्गस्थ झाल्या.

७/८ महिन्यांनी एका संध्याकाळी सानेमामी आणि प्रभा माझ्या घरी आल्या, हातांत गुलाबाची सुंदर फुले घेऊन !

'केव्हां आलात नागपूरहून ?'

'कालच. बंडूच्या घराची वास्तूशांत होती ना.'

'मला पत्र आलं होतं, बंडूचं. काय प्रभाताई ?' प्रभा पटकन् गुलाबाची फुले घेऊन पुढे आली. 'ती फुले स्वामींच्या चरणावर वहा.' मी म्हणालो.

'स्वामी, प्रभाचं पायाच .......' सानेमामींचा कंठ दाटून आला.

'समजलो, मामी. रोज कृतज्ञतेने श्रीदत्तप्रभुंच, श्रीस्वामीमहाराजांच स्मरण करीत चला. आता लवकर लाडू पाहिजेत. बरं का प्रभाताई.'

प्रभाताई गोड लाजली.

मी श्रीस्वामींना हात जोडले. माझ्या मुखांतून श्रीसमर्थांचा श्लोक बाहेर पडला.

**'सदा सर्वदा देव सन्नीध आहे ।**
**कृपाळूपणें अल्प धारिष्ट पाहे ॥**
**सुखानंद आनंद कैवल्यदानीं ।**
**नुपेक्षी कदा राम दासाभिमानी ॥३६॥**

★ ★ ★

## नुपेक्षी कदा राम दासाभिमानी ।

मुलुंडचे श्री. पपा पणदुरकर आणि त्यांची मुलगी ललिता माझ्या घरी आले, तेव्हां मी नुकताच पूजा करून उठलो होतो. ललिता आपल्या ६/७ वर्षाच्या मुलाला बरोबर घेऊन आली होती.

'स्वामी, हा माझा नातू चिन्मय–ललिताचा मुलगा. ह्याच्या मांडीवर नेहमी एक तांबडा चट्टा उठतो. काही दिवस कमी, काही दिवस जास्त, पण हे दुखणे बर काही होत नाही. डॉक्टर, सर्जन, स्पेशालिस्ट, वैद्य .........'

'सर्वांचं औषध दिलंत. आतां वैद्यांचा जो वैद्य, धन्वन्तरि आणि अश्विनीकुमारांचा गुरु, त्यांचं औषध द्यायचं, श्रद्धाभक्तियुक्त, अंत:करणाने. काय लले, जमेल का ?'

'हो तुम्ही सांगाल तसे करू.'

'बघ, हं.' मी तिला संकल्पपूर्वक '**दद्रुस्फोटक कुष्ठादि . . .** ओळी लिहून देवून वर्षभर ही उपासना करायला सांगितली.

'दररोज रात्री दूधांतून ही विभूति मुलाच्या मांडीला लाव. सकाळी आंघोळ करताना मांडी कोंबट पाण्याने स्वच्छ कर. काय, समजलं ना ? मध्ये फोन करायचा नाही. भेटायलाहि यायचं नाही.'

'काही अडचण आली तर . . . . . . . .'

'अडचण येणारच नाही. उद्यापासून सुरुवात करायची. तपशील मी सांगितला आहेच. निघालीस कुठें ? प्रसाद घेऊन निघायचं.'

श्री. पपा पणदुरकर, ललिता, चिन्मय मार्गस्थ झाले.

अधूनमधून पपा फोन करून चिन्मयची प्रगती मला कळवीत होते.





एका सकाळी ते चिन्मयला माझे घरी घेऊन आले. त्याला पहाताच मी सुखावलो. तो व्याधिमुक्त झाला होता.

प्रसाद देताना मी म्हणालो, 'पपा, ललीला सांगा, उपासना वर्षभर झाली पाहिजे. उपचारहि चालू राहिला पाहिजे वर्षभर.'

पपांनी मान डोलावली. त्यांचे डोळे लकाकत होते.

★ ★ ★

## कुलदेवता कोण, हें कसें कळेल ?

कुलदेव, कुलदेवता यांचे कुलाचार सर्वप्रथम करणे अत्यावश्यक आणि अगत्याचे आहे. ते व्यवस्थित होत नसतील तर दैनंदिन संसारी जीवनांत अनेक कटकटी निर्माण होतात. आपले उपास्यदैवतहि (श्रीराम, श्रीविष्णु, श्रीदेवी वा श्रीसाईबाबा, श्रीगजाननमहाराज, श्रीअक्कलकोटस्वामी आदि) त्यामुळे साहाय्यभूत होऊ शकत नाही.

मुलांची प्रगती खुंटली. पैसा पुरे पडेनासा झाला. घरांत कोणी ना कोणी कायम आजारी राहू लागला, म्हणजे मग घरच्या कर्त्या पुरुषाला वा स्त्रीला जाग येते, मग शोध सुरु होतो की, हे असे का होते ? मुलं २०/२२ वर्षांची होतात तरी आई-वडीलांना, कुलदेवता त्यांचे कुलाचार माहिती नसतात ! मग दर्शन, पूजन लांबच राहिलं. पुढे शोध सुरु होतो. माहिती मिळत नाही. सर्व काही नीट सांगेल असं कुणी भेटत नाही. अनुभवी, जाणकार म्हातारी माणसं काळाच्या पड्याआड गेलेली असतात. माणसं हताश होतात. आता काय करायचं ?

श्रीसरस्वति गंगाधर कृत **श्रीगुरुचरित्र ग्रंथाचा फक्त पहिला अध्याय** दररोज एकदां असा ७ दिवस, खंड न पडता, संकल्पपूर्वक वाचावा, म्हणजे त्या अध्यायाचा १ सप्ताह झाला. असे लागोपाठ २८ सप्ताह ही उपासना करावी. सप्ताह करताना आसन, उदबत्ती, निरांजन, नैवेद्य, उपासनेची ठराविक वेळ सांभाळणे वगैरे नित्याची कर्मे योग्य तऱ्हेने करावीत. २८ सप्ताहांत श्रीकुलदेव-देवतांची माहिती मिळते, स्वप्न दृष्टांतात ते स्थळ दिसते. कुणी तरी घरी येऊन सहज तपशील सांगून जातो. विविध अनुभव येतात. (जरूर तर आणखी २८ सप्ताह उपासना करावी.)

उपासना करताना दररोज संकल्प करणे अगत्याचे आहे. संकल्प असा असावा, 'हे सर्वशक्तिमान, दयाघन प्रभो, मला व माझ्या कुटुंबातील इतर मंडळींना आमची कुलदेव-देवता व त्यांचे कुलाचार माहित नाहीत. तू कृपावंत होऊन त्यांची संपूर्ण माहिती आम्हाला लवकरात लवकर कळेल असे कर. आमच्या सर्वांकडून त्यांची यथायोग्य सेवाहि घडू दे. आम्हाला सर्वार्थाने समर्थ कर आणि श्रीचरणसेवारत ठेव.'

भगिनीवर्गाने 'अडचणीचे ५ दिवस' ही उपासना करू नये, मात्र ह्यामुळे उपासनेत पडलेला खंड, तितके अधिक दिवस सेवा करून भरून काढावा, म्हणजेच भगिनींना ही सेवा प्रसंगी ३३ सप्ताहसुद्धा करावी लागेल. स्त्रियांनी श्रीगुरुचरित्र वाचावे कीं वाचू नये, ह्या वादांत शिरण्याचे काहीहि कारण नाही. ह्या अध्यायाची उपासना नि:शंक मनानें, अतूट श्रध्दा, भक्तिपूर्वक सर्वांनी करावी. श्रीदत्त प्रभु उपासनेने प्रसन्नच होतील. शंका नको. शुभस्य शीघ्रम् ।





**श्रीसद्गुरु प्राप्तीसाठीहि** ह्या अध्यायाची, ह्याच पद्धतीने, उपासना करण्याची पद्धत आहे.

★ ★ ★

## प्रदक्षिणा कां ?

'धंद्याचा व्याप वाढवता, वाढवता, गरज म्हणून इतरत्र भोजनास जाऊं लागलो. धंदा वाढत गेला. व्याप वाढत गेला. एकाएकी भोजनातून विषबाधा झाली. खूप औषधोपचार केले, पण खडखडीत बरा झालो नाही. कुणी तरी सुचविले म्हणून मग औदुंबराला नियमाने, संथपणे प्रदक्षिणा घालू लागलो. गुण येऊं लागला. १ लक्ष प्रदक्षिणा पूर्ण होताच खडखडीत बरा झालो.' विक्रम भागवत आपला अनुभव मला सांगत होते. एका औषधी कंपनीचे ते मार्केटिंग डायरेक्टर आहेत.

आपल्याकडचे बेल, वड, पिंपळ, औदुंबर हे पुण्यवृक्ष-औषधीवृक्ष आहेत. औदुंबराचे पाणी अतिशय थंड आहे. खूप जुन्या औदुंबराची साल गंधासारखी उगाळून भाजलेल्या जागी लावल्यास अतिशय थंडावा येतो. भाजल्याच्या खुणाहि (व्रणहि) राहत नाहीत. वडाचं मूळ वीर्यवर्धक आहे. त्याच्या पारंब्यांचा काढा अनेक उष्णविकारांवर वापरता येतो. ह्या सर्व वृक्षातळी बसून केलेली साधना-उपासना त्वरित फलदायी होते, असा अनुभव आहे.

देवाच्या मूर्तीची प्राणप्रतिष्ठा करताना तिच्या आसनाखाली (पायाखाली) अनेक मौल्यवान वस्तू, विधिपूर्वक, मंत्रघोषात, छोटासा खड्डा खणून ठेवण्यात येतात. मूर्तिवरहि प्रतिदिन पूजेच्या वेळी मंत्रोपचार करण्यात येतात. ह्या साऱ्यामधून जे तेजाचे, चैतन्याचे प्रक्षेपण दिन–प्रतिदिन होत रहाते. त्याला ठराविक क्षमता असते. त्या परिघात राहून संथपणे, आपल्या चित्तवृत्ति शांत ठेवून, प्रदक्षिणा घातल्यास नि:संशय लाभ होतो. गरोदर स्त्री, कंबरेवर पाण्याची भरलेली घागर घेऊन जशी संथपणे चालेल, तसे चालत प्रदक्षिणा घालावयाच्या असतात. श्रीगुरुचरित्रात (अध्याय ३९) वर्णन करताना श्रीसरस्वती गंगाधर लिहितात :

**'मनसा-वाचा-कर्मणेसी । भक्तीपूर्वक भावेसी ।**
**प्रदक्षिणा कराव्या हर्षीं । पुरुषसूक्त म्हणत देखा ॥७९॥**

**अथवा सहस्त्रनामेसी । कराव्या प्रदक्षिणा हर्षीं ।**
**अथवा कराव्या मौन्येंसी । त्याचे फळ अमित असे ॥८०॥**

**चाले जैसी स्त्री गर्भिणी । उदक कुंभ घेऊनी ।**
**तैसे मंद गतीनी । प्रदक्षिणा कराव्या शुद्धभावें ॥८१॥**

**पदोपदीं अश्वमेध । पुण्य जोडे फळप्रद ।**
**प्रदक्षिणा समाप्त मध्य । नमस्कार करावा ॥८२॥**

मंदिर कितीहि भव्य असले तरी, सर्वसाधारणपणे, त्या प्रदक्षिणा कक्ष (प्रदक्षिणेची वाट) ठराविक रुंदीची असते. भारती





स्थापत्यशास्त्रात अनेक गोष्टींचा मोठ्या कुशलतेने उपयोग केला आहे. त्याला ज्योतिषशास्त्राने यथोचित साथहि दिली आहे.

वड, पिंपळ, औदुंबर आदिना प्रदक्षिणा घालताना विज्ञानाच्या परिणामाचाहि विचार केला आहे. बुद्धिनिष्ठ संशोधकांनी निर्लेप मनाने ह्याचा वेध घ्यावा.

उपासना हा शेवटी अनुभवाचा–प्रचितीचा–भाग आहे. केवळ चर्चा करून त्यात हातीं काय येणार ?

★ ★ ★

## मांसाहार . . .

खेकडे, प्रचंड मासे, कोंबड्या, बकरे, गायी, बैल आणि अन्य चतुष्पाद प्राण्यांची हत्या करून सामान्यत: मांसाहार केला जातो. आपला मृत्यूसमीप आला असून आपल्याला लवकरच मारण्यात येणार आहे, ह्याची जाणीव वरील सर्व प्राण्यांना लगेच होते. ती सारी भेदरलेली, व्याकूळ, मनस्वी चिंतातूर, काही जीवनाच्या ाजीने सूड घेण्यास उत्सुक, संतापलेली, गलितगात्र झालेली, ाय करावे हे न सुचल्यामुळे केवळ भीतीने थरथर कांपत सतात. त्यांच्या मृत्यूनंतर हे सर्व भाव त्यांच्या शरीरांतील रक्त, स, मेंदू, मज्जा, हाडे आदिंत असतात. त्यांचे सेवन करणाऱ्या कींवर त्यांचे हेच परिणाम होणे अपरिहार्य नाही का ? नेहमी ाहार करणाऱ्या व्यक्तीच्या बाह्य शरीरावरहि त्याचा

परिणाम होतो. अशा व्यक्तींच्या घामाला, कपड्यांना एक उग्र दर्प येत असतो. गुन्हेगारी प्रवृत्तीच्या माणसांत, मांसाहारी व्यक्तींचा फार मोठा समावेश असल्याबद्दल आश्चर्य वाटण्याचे कारण नाही. जसा आहार तशी वृत्ती ! जे आडांत असेलं तेच पोहऱ्यांत येणार ना ?

★ ★ ★

**भूतकाळ आणि भविष्यकाळ ह्याच्या चिंतनात वर्तमान काळाची गळचेपी करू नका; समोर उभ्या असलेल्या क्षणाला न्याय द्या. फक्त तोंच क्षण तुमचा आहे !**

## तुमच्या राहत्या घरासाठीं ......
## तुमच्या लाडक्या माणसांसाठीं ......

'हे काय घर आहे ? सदैव किचकिच, तंटे, बखेडे. तू सुद्धा शब्द खाली पडू देवू नकोस. देवकी, नियमानं नवऱ्याशी भांडलच पाहिजे बरं का !' विनायकराव वैतागून म्हणाले.

'वाहात्या वाऱ्याबरोबर भांडणारी मी. तुम्ही भोळे सांबच ना देवस्थळ्यांचे सर्वच पुरुष गरीब म्हणून बोर्ड लागलाय सोसायटीच्या गेटवर.' देवकी चहाचं भांड आपटीत म्हणाली.

'म्हणून तर आज सत्कार आहे माझा सोसायटी हॉलमध्ये. मो एव्हढा जाडजूड हार घेऊन ये, हं.' विनायकराव खवचटपणे म्हणाले





घर, चाळ, ब्लॉक, अपवाद सोडून, सर्वत्र असेच सूर ऐकू येतात. अशान घरच सार सार वातावरण गढूळ होत. संघर्षमय, क्लेशदायी होत. घरात राहणारे नाखुषीने दिवस ढकलीत राहातात. हे बरं नव्हे. मग हे सारं कसं बदलता येईल ? वास्तू पुजनाने. वास्तू आणि पर्यायाने घर प्रसन्न ठेवून !

## वास्तू-पूजन

देवांसमोर, घरांत रांगोळीने केंद्रस्थानी, वर-खाली, प्रत्येकी २ ठिबके रेखून स्वस्तिक काढावे. त्यावर हळदकुंकू व गंधफूल दररोज वहावे. वहाताना म्हणावे ''ग्रामदेवता श्रीमहालक्ष्मी, श्रीमुंबादेवी, श्रीकाळबादेवी, ग्रामदेव श्रीबाबुलनाथ, श्रीवाळकेश्वर, श्रीभुलेश्वर, स्थानदेवता, इष्टदेवता, वास्तुदेवता सुप्रसन्ना वरदा भवतु।''

येथे संबंधिताने आपापल्या ग्रामदेवतांचे स्मरण करावयाचे आहे. (हे लक्षात आल असेलच) त्यानंतर उदबत्ती, निरांजन दाखवून धसाखरेचा नैवेद्य वास्तूस (स्वतिकापुढे) अर्पण करावा. ध्याकाळीहि उदबत्ती, निरांजन, नैवेद्य समर्पणाचा विधी अवश्य रावा.

तुमचे घर मालकीचे असो, भाड्याचे असो वा कोणी तुम्हाला स म्हणून दिलेले असो. प्रत्येकाने हे वास्तूपूजन करावे. तुदेवतेची अवकृपा असेल तर आपण सुखाने, समाधानाने तेथे शकणार नाही, हे पक्के लक्षांत ठेवावे. आपण वास्तूस प्रसन्न ! वास्तू घरभर प्रसन्नता पसरवील. हा नित्याचा वास्तूपूजनाचा आहे. घरभरणीच्या वेळी होमहवनयुक्त वास्तूपूजन असते. तो

विधी निराळा असतो. अर्थात तो संपन्न केल्यावरहि वर उल्लेखिलेले वास्तूपूजन दररोज करावे.

**वास्तू–पूजन कांहीं पथ्यें :**

वास्तूपूजन सुरु केल्यावर प्रामुख्याने घरांत एक पथ्य पाळावे. घरांतील कुणीहि अभद्र, आर्वाच्च भाषा घरात वापरू नये. वस्तूंची आदळआपट, हातपाय आपटीत चालणे, हातांच्या मुठी आवळीत, हात टेबलावर आपटीत उच्चस्वरांत बोलणे टाळावे. मुखांतून एकहि शद्ब नकारात्मक येऊ देवू नये. 'मी येतो बरं. दूध आणायला झाल आहे. कुंकू अधिक झालं आहे. बांगडी वाढवली आहे. आणू या, आ या. फ्रीज आणू या, कलर्ड टी.व्ही पण आणू या, हं.' हे आणि अ विचार घरांत प्रक्षेपित करावेत. 'मी जातो आता, दूध संपलय, कुं पुसलय, बांगडी फुटलीय. जळ्ळलं मेलं आमचं आयुष्य, म्हातार आलं तरी फ्रीज नाही. आतां खेळण्यातल्या तरी ह्या वस्तू घ आणून ठेवा, म्हणजे मी मेल्यावर माझ्या पिंडाला कावळा शि बरं.' असं चुकूनहि घरांत बोलू नका. वास्तुदेवता नेहमी 'त म्हणत असते ह्याचे भान ठेवा.

हातांतून सुटून खाली पडून फुटलेली अत्तराची वा सेंटची असो किंवा स्प्रेने उडवलेले सेंट असो, हाताने आग्रहाने ल कनोजी अत्तर असो. ते सुगंधाची उधळण केल्याशिवाय राहील ?

आपल्या राहत्या घरांत सुगंध, सुख, समाधान पेरायच संत्रस्ततेला आमंत्रण द्यायचं, हे तुम्हीच ठरवा.





**हें स्वस्तिक म्हणजे काय ?**

स्वस्तिक म्हणजे मांगल्याची सत्ता. मूर्तिमंत कल्याण. जेथे जेथे श्री, सुख, सौभाग्य, संपन्नता, सुसंवाद, उदारता, प्रेम, उल्हास, आनंद, अविस्मरणीय पावनता, नेत्रदीपक शोभा आहे, तेथे तेथे स्वस्तिक आहेच. स्वस्तिक मानवतेच्या विकासाच प्रतीक आहे. सर्व दिशांतून येणाऱ्या मंगलतेच, सुगंधाच, सौंदर्याच, सहिष्णुतेच, शांति, समृद्धि, प्रगतीच, भद्रतेच स्वागत म्हणजेच हे शुभचिन्ह. शिवशक्तीच प्रतीक म्हणजे स्वस्तिक !

मांगल्याच पूजन हे काया, वाचा, मन, बुद्धि आदि सर्वांगानं झालं पाहिजे. चांगल पाहू, चांगल बोलू, चांगल वागु, चांगला विचार करू, चांगले देवू, चांगल घेवू, चांगल्याच पूजन करू. सर्वत्र गल पेरत राहू. अविरत, अखंड, कारण . . . . . . . .

घरा–दारात, उद्योग–व्यवसायात, अंगणात–प्रांगणात, अणु–त, श्वासाश्वासागणिक आम्हाला मांगल्याचा साक्षात्कार हवा. त्यानं सारं जग सुखान मोहरेल. नक्की. शंकाच नको !

★ ★ ★

## वास्तूशांत अशीहि करता येते !

प. पू. श्रीगुरुदेव रानडे यांनी निंबाळ येथे आपले नवे घर ावर, घराची वास्तूशांत अभिनव, अर्थगर्भ पद्धतीने साजरी

संतर्पणासह अखंड ७२ तास (३ दिवस–रात्र) नामघोष

त्यांनी त्या वास्तूंत केला. घराचा कानाकोपरा श्रीहरीच्या मधुर नामाने दुमदुमून गेला, अणूरेणू शुद्ध, पावन, प्रेरक झाला. अन्य मंत्रघोषांची आवश्यकताच उरली नाही.

आपणहि स्वत:चे घर बांधले; भाड्याची जागा वा ओनरशीपचा फ्लॅट घेतला तर स्नेही, सोबती, नातेवाईक, साधक बंधु-भगिनींच्या साहाय्याने अखंड ७२ तास नामस्मरण करून ती संपूर्णतया शुद्ध, सात्विक, पावन करूं शकता.

नामस्मरणासोबत यथाशक्य अन्नदान करावे, म्हणजे दुधांत साखर पडेल.

भगवंतावर पूर्ण श्रद्धा ठेवून नामस्मरणासह अन्नदान केल्यावर ब्राह्मणद्वारे अन्य कोणताहि संस्कार करण्याची आवश्यकता उरणा[illegible] नाही, तो करूच नये अशा मताचे आम्ही नाही. ज्यांना मनुष्यबळ[illegible] अर्थबळ नसेल त्यांचेसाठी वरील सोपी, सुटसुटींत, भावपूर्ण उपाय- योजना सूचविली आहे. तिला संत-महंतांची मान्यता आ[illegible] होमहवन-वास्तूनिक्षेप आदिंसह पुरोहितद्वारे केलेली वास्तूश[illegible] नि:संशय चांगलीच आहे.

## वास्तूशांतीला आणखी एक सुलभ पर्याय !

ज्याच्या स्वत:च्या घराची, फ्लॅटची (भाड्याच्या जागेचीसु[illegible] वास्तूशांत करावयाची असेल त्यांचेसाठी आणखी सोपा, सुटसु[illegible] भावपूर्ण पर्याय सुचवित आहोत.

१) घरांतील सर्वांत जुनी, प्रदीर्घकाळ पूजन केलेली, [illegible]





तसबीर घ्यावी किंवा अनुग्रहित साधकाने श्रीसद्गुरुंनी प्रसाद म्हणून दिलेली प्रासादिक एक वस्तू घ्यावी. ते शक्य नसले तर घरांतील श्रीबाळकृष्ण-श्रीअन्नपूर्णेची वा श्रीगणेशाची नित्य पूजनातील मूर्ति घ्यावी. हे घरांतील कर्त्या पुरुषाजवळ/महिलेजवळ देणे.

२) त्यामागे गृहलक्ष्मीने वा अन्य कोणी तेलाचा प्रज्वलित लामण दिवा वा २ वातींचे तुपाचे प्रज्वलित निरांजन घ्यावे.

३) त्याच्या मागे २ वा ५ प्रज्वलित उदबत्त्या घेतलेली व्यक्ति असावी.

४) त्याच्या मागे घंटा वाजवीत कोणीतरी चालावे.

५) सर्वांत शेवटी, श्रीगणेशकवच, श्रीदत्तकवच, श्रीदेवीकवच, श्रीरामरक्षा आदिकवच, (कोणतेहि एक कवच) श्रीघोरात्कष्टात् स्तोत्र, श्रीसखाराम सोनाजींचे स्तोत्र ही तीनहि आसनस्थ होऊन, प्रत्येकी ११ वेळा मोठ्याने म्हणून पाणी अभिमंत्रित करावे. (स्तोत्रे वगैरे म्हणताना उदबत्ती, तुपाचे निरांजन अवश्य लावावे. उदबत्तीची विभूति अभिमंत्रित पाण्यांत टाकावी.) त्या पाण्याचा तांब्या/पातेले घेऊन ते जल शिंपडीत गृहप्रवेश करावा.

पाचहि जणांनी वास्तूंत प्रवेश करून डाव्या बाजूने सर्व जागेंत [illegible]रत फिरत (ह्यांत संडास, बाथरूमचाहि समावेश असावा. [illegible]थरूममध्ये सर्वांनी हात-पाय धुवावेत. त्यावेळीं आपल्या [illegible]तांतील वस्तू दुसऱ्या व्यक्तिजवळ द्यावी. खाली जमीनीवर वा [illegible]त्र ठेवू नये) अभिमंत्रित पाणी शिंपडीत गृहप्रदक्षिणा पूर्ण करावी. [illegible]पून सुरुवात केली तेथपर्यंत घरांतून पाहोचावे,) नंतर पुढल्या

व्यक्तिच्या हातांतील तसबीर–प्रसादवस्तू–देव आसनस्थ करून त्याचे हळद, कुंकू, गंध (चंदन), अष्टगंध, फुलांनी पूजन करावे. धूप–दीप दाखवावा. नैवेद्य अर्पण करावा. आरती, मंत्रपुष्प म्हणावे, सर्वांनी बैठकीवर बसावे.

सुमारे अर्धातास तरी मोठ्याने नामस्मरण करावे, त्यानंतर प्रसा वितरण करावे. अन्य खाद्य पदार्थांसोबत, स्टोव्ह–गॅसवर (प्रथ त्यांचे पूजन करावें) तेथेच केलेला चहा, कॉफी, दुधाचा प्रस उपस्थितांना द्यावा. काही काळ त्या वास्तूंत थांबावे. शक्य असेल रात्री तेथेच मुक्काम करावा. अशी भावपूर्ण, पूर्ण श्रद्धेने केले वास्तूशांतसुद्धा नि:संशय लाभदायी होतेच. त्यादिवशी अत्यंत व्यक्तिंना, संस्थातील पीडित, असाहाय्य, आजारी व्य यथाशक्य अन्नदान केल्यास दूधांत, साखरेसह केशरच पडेल

आवश्यक ती *तीन स्तोत्रे येथे देत आहोत.

---

**'गुरुचरणीं ठेविता भाव । आपोआप भेटे देव**
**म्हणूनि गुरुसी भजावें । रूप ध्यानासी आणा**
**देव गुरुपाशी आहे । वारंवार सांगू का**
**तुका म्हणे गुरुभजनीं । देव भेटे जनीं व**

★





## *||श्रीदत्तात्रेयकवचम् ||

श्रीपाद: पातु मे पादावूरू सिद्धासनस्थित: || पायाद्दिगंबरो गुह्यं नृहरि: पातु मे कटिं ||१|| नाभिं पातु जगत्स्रष्टोदरं पातु दलोदर: || कृपालु: पातु हृदयं षड्भुज: पातु मे भुजौ ||२|| स्रक्कुंडीशूलडमरूशंखचक्रधर: करान् । पातु कंठं कंबुकंठ: सुमुख: पातु मे मुखम् ||३|| जिव्हां मे वेदवाक्पातु नेत्रे मे पातु दिव्यदृक् || नासिकां पातु गंधात्मा पातु पुण्यश्रवा: श्रुती ||४|| ललाटं पातु हंसात्मा शिर: पातु जटाधर: । कर्मेंद्रियाणि पात्वीश: पातु ज्ञानेंद्रियाण्यज: ||५|| सर्वान्तरोन्त: करणं प्राणान्मे पातु योगिराट् || उपरिष्टादधस्ताच्च पृष्ठत: पार्श्वतोऽग्रत: ||६|| अंतर्बहिश्च मां नित्यं नानारूपधरोऽवतु । वर्जितं कवचेनाव्यात्स्थानं दिव्यदर्शन: ||७|| राजत: शत्रुतो हिंस्त्राद् दुष्प्रयोगादितोघत: || आधिव्याधिभयार्तिभ्यो दत्तात्रेय: सदावतु ||८|| धनधान्य-गृहक्षेत्रस्त्रीपुत्रपशुकिङ्करान् ज्ञातींश्च पातु नित्यं मेऽनसूयानंदवर्धन: बालोन्मत्तपिशाचाभो द्युनिट्संधिषु पातु मां || भूतभौतिक- मृत्युभ्यो हरि: पातु दिगंबर: ||१०|| य एतद्दत्तकवचं संनह्याद्भक्ति ... । सर्वानर्थविनिर्मुक्तो ग्रहपीडाविवर्जित: ||११|| भूतप्रेत- ... दैवैरप्यपराजित: || भुक्त्वात्र दिव्यभोगान्स देहान्ते ...त् ||१२||

... प.प. *श्रीवासुदेवानंद सरस्वतीविरचितं श्रीदत्तात्रेयकवचं*

# *अघोरकष्टोद्धरण स्तोत्र

श्रीपाद श्रीवल्लभ त्वं सदैव । श्रीदत्तास्मान्पाहि देवाधिदेव । भावग्राह्य क्लेशहारिन्सुकीर्ते । घोरात्कष्टादुद्धरास्मान्नमस्ते ॥१॥ त्वं नो माता त्वं पिताऽऽप्तोऽधिपस्त्वम् । त्राता योगक्षेम-कृत्सद्गुरुस्त्वम् । त्वं सर्वस्वं नोऽप्रभो विश्वमूर्तेघोरात्कष्टा दुद्धरास्मान्नमस्ते ॥२॥ पापं तापं व्याधिमाधिं च दैन्यं । भीति क्लेशं त्वं हराऽशुत्वदन्यम् । त्रातारं नो वीक्ष ईशास्तजूर्ते घोरात्कष्टादुद्धरास्मान्नमस्ते ॥३॥ नान्यस्त्राता नापि दाता भर्ता । त्वत्तो देव त्वं शरण्योऽकहर्ता । कुर्वात्रियानुग्रहं पूर्ण राते घोरात्कष्टादुद्धरास्मान्नमस्ते ॥४॥ धर्मे प्रीतिं सन्मतिं देवभक्तिम् सत्संगाप्तिं देहि भुक्तिं च मुक्तिम् । भावासक्तिंचाखिलानंदमूर्ते घोरात्कष्टादुद्धरास्मान्नमस्ते ॥५॥ श्लोकपंचकमेतद्यो लोकमंग वर्धनम् प्रपठेन्नियतो भक्त्या स श्रीदत्तप्रियोभवेत् ॥६॥

*॥ इति प.प. श्रीवासुदेवानंद सरस्वती विरचितं अघोरकष्टो स्तोत्रं संपूर्णम् ॥*

★ ★ ★



॥ श्रीगुरु:शरणम् ॥

# * सखाराम सोनाजी स्तोत्र

श्रीगणेशायनमः । ॐ श्रीपाद श्रीवल्लभ श्रीदत्तराज । नरहरि गुरवे नमः । ॐ श्रीसच्चिदानंदात्मे नमः । पालयमां दीनबंधू । गुरुदत्त जनार्दन एकनाथ कृपा करी । अंबे त्रिपुरसुंदरी । ॐ नमो भगवते मातोश्री । सकल भयोच्चाटणाय । भैरवाय भूतप्रेत पिशाच ब्रह्मराक्षस वेताल शाकिनी डाकिनी भानामति छिंदय । ॐ ऱ्हां ऱ्हीं ऱ्हुं यं यं रं रं लं लं वं वं शं शं दिग्बंधनं । परविदत्त परमंत्र परयंत्र परतंत्र छेदय छेदय ।

सर्व दुष्टग्रह निवारय निवारय । जारण मारण उच्चाटय उच्चाटय । ...करण शोषय शोषय मोहय मोहय । ज्वालय ज्वालय । सर्व ...ादि बाधा । निवारय निवारय । स्वमंत्र स्वयंत्र । स्वतंत्र ...ाय । ॐ ऱ्हीं ऱ्हीं ऱ्हीं हूं हूं हूं फट् स्वाहा । सखाराम सोनाजी माझा नमस्कार असो. विद्या राख.

★ ★ ★

## वास्तूदोष कसा जाईल ?

वडीलोपार्जित वास्तू, शहरांत वा खेडेगांवात भाड्याने घेतलेली जागा वा मालकीतत्वाने घेतलेली जागा, दूषित असेल तर ती सोडणे अडचणीचे आणि तेथे राहणे वा उद्योग व्यवसाय करणे संकटास आमंत्रण देणारे, कायम कटकटींचे. ह्यातून सुटका कशी होणार?

'नाग–नारायण बळी' सारखे विधी श्रीक्षेत्र त्र्यंबकेश्वर (नाशिकजवळ) येथे जाऊन सहकुटुंब सहपरिवार करावयाचे, हिताचे असले तरी खूप खर्चिक, प्रसंगी आवाक्याबाहेरचे.

संकल्पपूर्वक श्रीनवनाथ वा श्रीगुरुचरित्र ग्रंथाची सतत पारायणे करणे (सप्ताह किमान ५४ ते १०८) हिताचे व इष्ट असले तरी धांवपळीच्या दैनंदिन जीवनांत जमणे वा जमविणे खूपच त्रासाचे जागेचा प्रश्न, 'अडचणींचे दिवस' पाळण्याचा प्रश्न, वेळेचा–रजेच प्रश्न, शारीरिक स्वास्थ्य आदि कितीतरी प्रश्न. ब्राह्मणाद्वारा हे स करावयाचे म्हटले तर आचारसंपन्न, सर्व नियम पाळून अशी पाराय करणारे पुरोहित दुर्मिळ. मिळालेच तर त्यांची दक्षिणा वा मानधन जमले पाहिजे. मध्यमवर्गीय गृहस्थ वा व्यापारी ह्यांची दोन्हीं बा कुचंबणाच होते. करायला तर हव, पण करता तर येत नाही, ही मनी ठेवूनच ते दिवस ढकलत असतात. मग करायच काय ?

**ॐ नम: शिवाय ।** ह्या सिद्धमंत्राचे मोठ्याने नामस्मरण कर कसे ? घरांतील प्रत्येक खोलीत, (उद्योगव्यवसायांतील प्र खात्यांत) खिडक्या, दरवाजे बंद करून, सांघिक, मो नामस्मरण करावे. एकाने सांगावे, इतरांनी म्हणावे. किमान





माळा (प्रत्येक माळ १०८ मण्यांची) नामस्मरण करावे. सकाळी किंवा संध्याकाळी हे आपल्या सोयीनुसार करावे. दोन्ही वेळा केले तर उत्तम. मात्र सांघिक जप माळांप्रमाणे मोजावा. ३ माळा x ३ माणसे म्हणजे ९ माळा असा हिशोब करू नये. प्रत्येक खोलीत सुरुवातीला किमान ६ हजार जप तरी व्हावा. दैनंदिन जप झाल्यावर १० मिनिटांनी खोलीच्या खिडक्या व दरवाजे उघडावेत. त्यानंतर एकूण जप ६ लाख होईल हे पहावे. त्याचे चांगले अनुभव येऊ लागतील. एकदा खात्री झाली की, प्रत्येक खोलीत ६ लाख जप पुरा करावा. जप करताना तुपाचा दिवा, उदबत्ती लावावी. श्रीशिवासाठी छोटे आसन ठेवावे. 'नामजपाला उपस्थित राहून कार्य सिद्ध करा. सुसह्य होईल असे दर्शन द्या,' असे म्हणावे. शक्यतर आसनावर पांढरे फूल वा बिल्वपत्र वहावे. जप संपल्यावर दूधसाखरेचा नैवेद्य अर्पण करावा. (नंतर तो सर्वांनी घ्यावा.) नमस्कार करून आसन उचलून ठेवावे. जपास सुरुवात करण्यापूर्वी संकल्प करावा. 'हे दयाघन, मंगलमय शिवशंभो, आपण परमकृपाळू होऊन आमच्या राहत्या/व्यवसायाच्या संपूर्ण वास्तूतील सर्व दोष समूळ नष्ट करून, वास्तू सर्वार्थाने मंगलमय, आनंदमय, सात्विक, प्रेरक, यश, श्री, आनंद देणारी, आरोग्यवर्धक, विद्यावर्धिनी, कल्याणकारी करा. स्तूतील वाईट प्रवृत्तींच्या सर्व शक्तिंना मुक्ती द्या.'

वास्तू सुखकर झाल्यावर दररोज एक माळ जप सुरूच ठेवावा. प्रदोष, प्रदोष वा श्रीमहाशिवरात्रीस २४ तास अखंड नामस्मरण र तर मित्रमंडळींचे साहाय्य घेऊन) अवश्य करावे.

'अडचणीचे दिवसांत', भगिनींनी जपांत सक्रिय भाग घेऊ नयें
उष्णतेचे विकार वाढतील. रक्तस्त्राव बराच होईल वगैरे त्रा
संभवतो.

जीवन सर्वार्थाने सुखमय होण्यासाठी '**ॐ नम: शिवाय ।**' हा
लाख जप घरांतील सर्वांनी मिळून लिहून काढला तर फारच छा
लिहिताना तोंडाने जप म्हणावा. जप करताना, लिहिता
लावलेल्या उदबत्तीच्या विभूतीचा (स्वच्छ करून) दैनं
कपाळाला लावण्यासाठी, धान्यांत, चहा, कॉफी, साखर आ
टाकण्यासाठी उपयोग करावा. फायदाच होईल. अग्निहोत्राचे
झाडांना, फुलांना, फळझाडांना घातल्यावर येणारे पीक अधि
उत्तम दर्जाचे येते, हे प्रयोगाने सिद्ध झाले आहे. मग संकल
केलेल्या नामजपाचे भस्म वा विभूति का फलदायी होणार ना



## उंबरठा आणि ......

उंबरठा म्हणजे मर्यादा ! तुमच्या ब्लॉकला, खोलीला उंब
कां ? नसल्यास, शक्यतों औदुंबराच्या लाकडाचा (नाही
लाकूड तर मग साग वा बर्मा–टीक वापरा.) करवून घ्या.
नसल्यास संगमरवरी दगडाची पट्टी लावावी. शक्यतो का
दगड लावू नये. फार पूर्वीपासून घरची कर्ती स्त्री स्नानोत्तर
वा दाराशी स्तोत्र म्हणत रांगोळी काढल्यावर, कुंकू मिश्रि





उंबरठा पुसून त्यावर रांगोळी घालीत असे. त्यांत स्वस्तिक, शंख,
पद्म, चक्र, गोपद्म आदि शुभचिन्हे काढत असत. गंध, फुल, हळद-
कुंकू आदिंनी उंबरठ्याची पूजा केली जात असे. उंबरठ्यावर उभे
रहाणे, बसणे टाळावे. जाता येताना त्यावर पायहि देवू नये. घरच्या
मांगल्याची, सात्विकतेची, पावित्र्याची, वैभवाची, पराक्रमाची ती
सीमारेषा आहे. नुसती उंबरठ्याची पूजा न करता त्याच्या डाव्या व
उजव्या टोकास दरवाजा तोलून धरणाऱ्या फ्रेमच्या उभ्या दोन उंच
लाकडी पट्ट्या असतात, त्यांचेहि पूजन करावे. त्यांना 'जय',
'विजय' म्हणतात. खऱ्या अर्थाने दरवाजा–म्हणजेच घर–त्याच
सांभाळतात. दरवाजाशी 'जय', 'विजय' म्हणजे घरांत श्रीविष्णूचे
य–वैकुंठ हवे. खरं ना ? घरांत लक्ष्मी आणि नारायणहि हवेत.
त. अमावास्या आणि पौर्णिमेला तिन्हीसांजा उंबरठ्यावर ५
रच्या वड्या प्रज्वलित करून त्यांना नमस्कार करावा. पृथ्वी,
, तेज, वायु, आकाश ह्या पंचमहाभूतांचे ते स्वागत व पूजन
प्रतिवर्षी भाऊबीजेला पंचमहाभूतांचे स्वागत व पूजन कसे
त, त्याची माहिती स्वतंत्रपणे दिली आहे. अनेकांना त्याचे
अनुभव आहेत.

ठ्याच्या आंतील बाजूस (घराकडील बाजूस) साफसफाई
वनाच्या पावडरची एक ह्या टोकांपासून त्या टोकांपर्यंत रेघ
, उगाळलेले ओले चंदन (गंध) पातळ करूनहि घालावयास
ाही. हे नेहमी न विसरता करावे. त्यायोगे, घराबाहेरील
मानवी शक्तींचा त्रास होत नाही.

उंबरठ्याच पूजन करताना श्रीदत्त, देवी, शिव, हनुमान आदि
आपणास आवडेल ते कवच अवश्य म्हणावे. ते येत नसल्यास अग
वाचताहि येत नसल्यास

१. **'मां पाहि भगवन् दत्त ।'**
२. **'त्वं माता त्वं पिता बंधुः सद्गुरुस्त्वं दयानिधिः ।**
**अऽन्यो न परो देवस्त्राहि मां भवसागरात् ॥'**
३. **'श्रीपाद श्रीवल्लभ नरहरि, दत्तात्रेया दिगंबरा ।**
**वासुदेवानंद सरस्वती, सद्गुरुनाथा कृपा करा ॥'**
४. **'नमः शिवाय । शिवाय नमः ॥'**
५. **'ॐ नमः शिवाय ।'**
६. **'दिगंबरा दिगंबरा श्रीपादवल्लभ दिगंबरा ।'**
७. **'ॐ श्रीराम जय राम जय जय राम ।'**
८. **'श्रीराम जय राम जय जय राम'**
९. **'रामकृष्ण हरि, रामकृष्ण हरि'**
१०. **'पापं तापं व्याधिमाधिंच दैन्यं,**
**भीतिं क्लेशं त्वंहराऽशुत्वदन्यम् ।**
**त्रातारं नो वीक्ष ईशास्त्तजूर्ते, घोरात्कष्टादुद्धरास्मा**
११. **'नमो नमो गणेशाय । विघ्नराजाय ते नमः ।'**

ह्यापैकी कोणताहि एक जप करीत रहावे.

★ ★ ★





# धार्मिक ग्रंथ–वाचन कसें करावें ?

अनन्य शरण जावून ! म्हणजे ?

आसनस्थ होऊन नित्याचे सर्व उपचार करावेत. ज्यांच्यावर ग्रंथ लिहिला आहे त्यांच्यासाठी किंवा ग्रंथकर्त्यासाठी छोटे आसन ठेवावे. (वाचणाऱ्याच्या उजव्या हाताला, मात्र आसनाचे तोंड दक्षिणेकडे असू नये.) ग्रंथ वाचनास सुरुवात करण्यापूर्वी कुलदेव-कुलदेवता, माता–पिता–आचार्य, गृहलक्ष्मी, ग्रामदेवता, स्थान देवता, इष्ट वता, वास्तू देवतेचे स्मरण करावे. हात जोडून, विनम्र चित्ताने पकर्त्याचे नाव घेऊन त्याला प्रार्थना करावी. उदाहरणार्थ : 'हे नराजा, तुझी ज्ञानेश्वरी वाचण्याचा मी प्रयत्न करणार आहे. तू ाळू होऊन मला ती सर्वार्थाने समजेल असे कर. स्वतः उपस्थित न माझ्याकडून ही सेवा तू करवून घे. माझ्या दैनंदिन जीवनात, ारात तिचे प्रतिबिंब पडू दे. माझे जीवन तूं कृतार्थ कर.' नावर फुले वहावीत. ज्ञानोबा माऊली आसनस्थ झाली आहे, समजून उदबत्ती, निरांजन ओवाळा. दूध–साखरेचा नैवेद्य त्यांना करा. मग करा सुरुवात . . .

**मोजी आद्या । वेदप्रतिपाद्या**
**जय स्वसंवेद्या । आत्मरूपा ॥१॥**

वातावरण चैतन्यमय, मंगलमय होईल. अर्थ-आशय, मये, दृष्टांत सार सार तुमच्या समोर हात जोडून उभ राहील. थोर ज्ञानेश्वरी उपासक **श्री. दादाजी म्हाळगी** सांगतात

त्याप्रमाणे 'एक पथ्य पाळायचं. ग्रंथकर्त्याची ओवी अगदी आहे तशीच वाचायची, त्यातील काही वगळायच नाही, त्यात काही पदरचं घालायच नाही ! अर्थामागून अर्थ उलगडत जाईल.' अस होत का ? अशी प्रार्थना फलद्रुप होते का ? शंकाच नको.

★ ★ ★

## माझ्या ज्ञानराजा . . .

नेवासा हे ज्ञानेश्वरीचे जन्मस्थान ! श्रीज्ञानोबाराय ज्या दगडी खांबास टेकून बसले होते, ज्ञानेश्वरी सांगताना, त्या खांबाचे तेथें देऊळ आहे. अहमदनगर जिल्ह्यातल ते एक पावन, देखण ठिकाण आहे.

१०/१२ वर्षांपूर्वी घडलेली घटना. श्री. दामोदरपंत कुलकर्णी व्यवसायाने सिव्हिल इंजिनिअर. त्यांची नेवाशाला बदली झाली त्याच वर्षी त्यांच्या लग्नाला २५ वर्षे पूर्ण झाली. मालतीबाई—त्यांची बायको—त्यांना म्हणाली.

'ऐकलं कां ? आपल्या लग्नाला २५ वर्षं पूर्ण झाली. आठवण म्हणून मला काय भेट देणार आहात तुम्ही ?'

'आता काय द्यायच शिल्लक राहिलय ? सर्व संसार तूच सांभाळतेस. मीच तुझ्याकडे खर्चासाठी पैसे मागतो.'

'तरी पण . . .'

'चला, नगरला जाऊ या. बघतो काही घेता येत का ?'

'काय हवय तुला ?'

'आता नाही सांगणार. बाजारात गेल्यावर पाहू या.'





दामोदरपंत मनांत थोडे धास्तावले होते. 'बाई, २५०/३०० रुपयांच पातळ वगैरे हवं म्हणाल्या तर ?'

दोघ नगरच्या बाजारात आले. 'हं ऽ, बोला कुठ जायच ? काय घ्यायचं ?' दामोदरपंत म्हणाले.

'हसणार नाही ना ? मग एक मागण मागते . . .'

दामोदरपंत जीवाचे कान करून ऐकू लागले. 'बोला.'

'फार दिवस मनात होत. आजवर जमलच नाही घ्यायला. मी ठरवलय, तुम्ही देणार असलात तर ज्ञानेश्वरीची सटीप, सुंदर प्रत घ्यायची.' क्षणभर दामोदरपंत अवाक् झाले.

दोघांनी एकमेकाकडे पाहिल.

'अवश्य घेऊ या.' पंतांचे आणि मालतीबाईंचे डोळे भरून आले होते. आपल्या बायकोची झेप पंताना प्रथमच कळत होती. पंत आनंदाने ज्ञानेश्वरी घ्यायला तयार झाल्यामुळे त्याहि मनोमन सुखावल्या होत्या.

लवकरच ज्ञानेश्वरीचा सप्तजन्मशताब्दि सोहळा नेवाशाला साजरा झाला. मंदिरात बरीच भक्तमंडळी ज्ञानेश्वरीच्या पारायणाला बसली होती. गाभाऱ्यातून वाचनाचा आवाज कसा येतो आहे ? म्हणून विश्वस्तांपैकी एक गृहस्थ आत डोकावले. पहातात तो आत स्वच्छ शब्दोच्चारात, शांतपणे एक स्त्री मोठ्याने पारायण करत होती. ते भारावून म्हणाले, 'माई, किती वर्ष वाचता आहात ज्ञानेश्वरी तुम्ही ?' 'हे माझे पहिलेच पारायण. काही चुकतंय कां ?' 'नाही, बा. माऊलीची कृपा आहे, तुमच्यावर.' गहिवरून ते गृहस्थ म्हणाले. मालतीबाईंच पारायण पुढे सुरू झाल.

दररोज त्या मंदिरात बसून मालतीबाई वाचन करू लागल्या. एक दिवस त्यांना काय वाटल कोण जाणे. ज्ञानोबांच्या स्पर्शाने पुनीत झालेल्या त्या दगडी खांबाजवळ आल्या. गाभाऱ्यात कुणीच नव्हत. भारालेल्या अवस्थेत त्या बोलू लागल्या.

'ज्ञानराजा, निर्जीव भिंतीला तूं सजीवाप्रमाणे चालवलस. रेड्याच्या मुखातून वेद वदवलेस, मग मी अजाण, अडाणी असले म्हणून कुठ बिघडल ? तू मला पोटाशी घे. तुझी ज्ञानेश्वरी माझ्या अंगप्रत्यंगातून प्रगटू दे रे. तुझी सेवा ह्या लेकराकडून तू करून घेणार नाहीस का ?' त्यांना हुंदका अनावर झाला. थरथरत त्यांनी त्या दगडी खांबाला मिठी मारली. त्यांचे अष्टसात्विक भाव जागृत झाले. नेत्रांतून अविरत अश्रू वाहू लागले. बराच वेळ त्या अवस्थेत मालतीबाई होत्या. रात्री पंताना हा प्रसंग सांगताना मालतीबाईंना अश्रू अनावर होत होते. मध्यंतरी थोडा काळ गेला आणि मालतीबाई ज्ञानेश्वरीवर प्रवचने करू लागल्या !

त्यासाठी गावोगाव जाऊ लागल्या. महाराष्ट्रात बऱ्याच भागात त्यांची रसाळ प्रवचने संपन्न झाली. पुढे सेवानिवृत्तिनंतर पंतानी साताऱ्याला आपल्या रहात्या घरात सुधारणा घडवून १००/१२५ माणसे बसू शकतील असा हॉल तयार करवून घेतला. एक लाक व्यासपीठ करवून घेतल. बाईंची प्रवचने आता घरीच सुरू झाल काही काळ पंतांनी हे सुख अनुभवले. ते मनोमन आनंदून गेले हो अचानक मालतीबाईंचं जीवनपुष्प ज्ञानोबा माऊलीच्या चर विसावलं ! साताऱ्याच्या पंतांच्या घरातल ते व्यासपीठ मो झालं, पोरक झालं !





माणगावी औदुंबराच्या पारावर माझ्याबरोबर बसलेले पंत शून्यात नजर लावून बसले होते. त्यांचे डोळे पाझरत होते. मलाहि अश्रू अनावर झाले होते. मी थरथरत हात जोडले. लाऊड स्पीकर मधून कोणीतरी अभंग आळवत होत.

**"तूं माझी माऊली । मी तुझें वासरू ॥**
**नको पान्हा चोरूं । पांडुरंगे ॥"** ★

## ग्रंथ पारायण : प्रार्थना

हे मंगलमूर्ते, शारदामाते, कुलस्वामिनी श्रीआर्यादुर्गे, कुलदेव श्रीधूतपापेश्वर, (संबंधितांनी आपल्या कुलदेवतेचे, कुलदेवाचे नांव घ्यावे.) दयाघन दत्तप्रभो, सकल श्रीगुरुपरंपरा, श्रीगुरुदेव–आपल्या पावन, प्रतापी, प्रेरक, प्रेमळ चरणांना विनम्र भावाने अभिवादन, वंदन करून मी . . . . पारायणास प्रारंभ करीत आहे.

आपण सर्वांनी दयाद्र अंत:करणाने मला सर्वार्थाने सक्षम, समर्थ, संपन्न, समृद्ध, सात्विक, आनंदमय अवस्था देवून हे पारायण सर्वार्थाने मजकडून संपन्न करून घ्या. यशवंत, जयवंत, प्रज्ञावंत, वरदवंत, श्रद्धावंत, स्वकार्यकुशल, सुसंस्कारी करून श्रीचरण-सेवारत करा. ठेवा. आईकडे काही मागावे लागत नाही. तिचे पूर्ण लक्ष बाळावर असतेच, तरीहि कृपांकित करून, कृपापात्र करा म्हणताना ळूच म्हणतो.

**'मागणे तें मागो देवा । द्यावी भक्तिभावे सेवा ॥'**

शुभं भवतु । ★

## निरांजन

निरांजन म्हणजे निष्कलंक. अंत:र्बाह्य स्वच्छ होणे. निर्मळ होणे. ते आत्मज्योतीचं प्रतीक आहे. प्रेरक आहे. पावन, परममंगल आहे. घृत म्हणजे तूप हे स्नेहाच, ममतेच, जिव्हाळ्याच, वात्सल्याचं, परम कारुण्याच द्योतक आहे. एकत्र आलेल्या कापसाच्या २ वाती अद्वैत, एकरूपता शिकवतात. एकरूप होऊन, निरपेक्ष प्रेमात ओलंचिंब भिजून, ज्ञानयुक्त – जाणीवपूर्वक – प्रकाशमान होऊन प्रभुला, सर्व, सर्व विसरून शरण जाणे, असं विरघळता आलं पाहिजे. त्यासाठी धूप लावून म्हणजे अहंकार घालवायचा, फुलं वाहून लीनता स्वीकारायची, नैवेद्याबरोबर समर्पण शिकायचं. स्वत:ला वाहून घ्यायचं. माझा कोणीतरी आहे आणि मी कोणाचा तरी आहे, ही भावना माणसाला खूप काही देवून जाते. त्यानं जीवन संपन्न, समृद्ध मंगलमय, आनंदमय होऊन जात. स्वत: शांत, मंद, निवांत जीव जगत, लोकांना प्रकाश, प्रेरणा देण, हे व्रत सोप नाही.

निरांजन चैतन्यप्राप्तीचा मार्ग दाखवतं. उपासनेत धूप, दी[illegible] नैवेद्याला अनन्यसाधारण महत्त्व आहे. प. प. श्रीवासुदेवा[illegible] सरस्वती (टेंब्ये) स्वामीमहाराज आपल्या

**'श्रीदत्तमहात्म्य'** ह्या ग्रंथात स्पष्टपणे लिहितात.

**'घृतदीप लावून एकांत। करता साधे प्रयोग ॥'**

म्हणून साधना, उपासना, अनुष्ठान काळांत तुपाचा [illegible] अत्यावश्यक आहे. जीवनाचा काना–कोपरा उजळून टाक[illegible]





प्रकाशमान करण्याचं, प्रेरक, सामर्थ्य, निरांजनांत आहे. श्रद्धाभक्तियुक्त अंत:करणाने वाटचाल करणे गरजेचे आहे.

★ ★ ★

## प्रकाशातून . . . प्रकाशाकडे !

'ताटके असं तुम्हाला का वाटतं ?' प. पू. श्रीबाबामहाराज कीर्तिकर मला विचारत होते. मी त्यांना मुद्दाम भेटण्यासाठी ठाण्याला आलो होतो.

'बाबा, ते नाही सांगता येणार, पण ह्या बाळंतपणांत माझी बायको काही रहात नाही, असं सारखं वाटतंय् मला.' मी उदासपणे म्हणालो. श्रीबाबांनी आकाशांत एकटक दृष्टि लावली. ओठांवर उजव्या हाताचं [illegible]ट आपटीत ते म्हणाले. 'तुमच्या म्हणण्यात तथ्य आहे. ताटके, [illegible] अस करा, तुमच्या डाव्या हाताला (म्हणजेच श्रीदत्तप्रभूंच्या [illegible]व्या हाताला) दररोज सायंकाळी, **ठराविक वेळेला,** मी सांगतो [illegible]ठिकाणी–तुपाचा दिवा–निरांजन लावत जा.'

'अवश्य करतो. कुठं लावू दिवा ?'

[illegible]ठाकुरद्वारला, श्रीकाळाराम मंदिरामागे एक औदुंबर आहे. हा [illegible]र श्रीअक्कलकोट स्वामींच्या मठासमोरच येतो. तेथे सुमारे [illegible]सव्वा वर्ष तरी हा दिवा तुम्ही लावत जा. मग पुढच पुढे पाहू.'

[illegible] काळ श्रीबाबांच्या सहवासात घालवून मी मुंबईला आलो. [illegible]ण्याला श्रीबाबांकडे मी बऱ्याच वेळा जात असे. श्रीदत्तप्रभु [illegible] श्रीगायत्री मातेची श्रीबाबांनी खूपच सेवा केली. ठाण्याला

त्यांच्या घराच्या परिसरांत, खारकर आळीत, आजहि श्रीदत्तप्रभु: आद्य श्रीशंकराचार्य आणि श्रीगायत्री मातेचं मंदिर आहे. त्यामागे एक सदाफलित, प्रचंड औदुंबर वृक्ष आहे. प.पू श्रीगुळवणीमहाराज, पुणे, प.पू. श्रीरंगअवधूतमहाराज, नारेश्वर आदि संत, महात्मे श्रीबाबांना खूपच मान देत असत. श्रीदत्तावतारांच्या १६ प्रतिवर्षीच्या पूजा, श्रीबाबा सातत्याने ७० वर्षांपेक्षा जास्त काळ करीत होते. लक्षाधीश असलेले, जागतिक कीर्तिचे फोटोग्राफर असलेले, श्रीबाबा श्रीदत्तप्रभूंच्या सेवेत अंत:र्बाह्य रंगून गेले होते.

माझी निरांजन उपासना सुरु झाली. यथाकाल पत्नी प्रसूत होऊन ८|| पौंडाचा मुलगा झाला. दोघेहि सुखरूप होते. सुमारे वर्षभराचा काळ संपत आला आणि एकाएकी माझ्या मुलाला – चि. मिलिंदला – जुलाब व उलट्या सुरु झाल्या. २/४ दिवसांत तो पार रोडावला. औषधोपचाराचाहि उपयोग होईना. त्याला हॉस्पिटलमध्ये ठेवण्यात आलं. पहिल्या दिवशी तो ऑक्सिजनवर होता. साऱ्या वातावरणात तणाव होता. पोरगा हाती लागणा नाही, असं साऱ्यांना मनोमन कळून चुकले होते. मी शांत होतो औदुंबर—निरांजन—उपासना सुरुच होती. वर्षभराच्या काळांत मी प्रवासात असलो तरी त्या ठराविक वेळेला, मी रेल्वेच्या डब्यातहि निरांजन लावून प्रार्थना करीत असे. माझी आ त्याचवेळी घरी देवाजवळ निरांजन लावी.

हॉस्पिटलमध्ये चि. मिलिंदच्या उशा—पायथ्याशी माझे स्ने नातेवाईक बसलेले असत. एक दिवस अचानक मला श्रीबाबा





आठवण झाली. मी लगेच ठाण्याला गेलो. श्रीबाबा औदुंबराच्या पारावर बसून श्रीदत्तपादुकांची पूजा करीत होते. मी लांबूनच ओरडलो, 'बाबाऽऽ.' 'या ताटके, या. तुमचा मुलगा येत्या शुक्रवारी घरी येईल. निश्चिंत रहा. श्रीदत्तप्रभूंना तुमची काळजी आहे.' मला हुंदकाच फुटला.

माझ्या पाठीवर प्रेमानं थोपटीत ते म्हणाले, 'राखणारा समर्थ असताना मारणाराची चिंता कसली करता ? उपासना सोडू नका. प्रभू टाकणार नाही.' मोठ्या उमेदीनं मी मुंबईस परतलो. शुक्रवारी मिलिंद घरी परतला ! त्याचा पुर्नजन्म झाला होता. त्याचं पूर्वीचं लुसलुशीत अंग, कुरळे केस, गुबगुबीत देहयष्टि सारं सारं गेलं होतं. हरवलं होतं, तो वाचला होता. हयात होता हे समाधान आम्हाला पुरेस होत. त्यानंतर निरांजन, उपासना सुरुच राहिली. ३/३|| वर्षांचा काळ लोटला. तेव्हा हळूच मी श्रीबाबांना प्रश्न केला. 'बाबा, औदुंबराला निरांजन कां लावायचं ?' 'ताटके, आधी तुम्ही उपासना केलीत आणि नंतर हा प्रश्न मला विचारलात, हे मला खूपखूप आवडलं. असाच नम्रतेन प्रश्न विचारायचा असतो. ...ालाच म्हणतात 'परिप्रश्नेन सेवया ।' श्रीकृष्ण अर्जुनाला हेच म्हणाला होता, बरं. औदुंबर हा कल्पवृक्ष आहे. जे मागाल ते ...ण्याच त्याच सामर्थ्य आहे. निरांजन ही तेजाची, ओजाची, ...तन्याची, प्रकाशाची, पावनतेची, वंशवृद्धीची, प्रेरक, उपासना ...ाहे. उपासकाला त्याच फळ मिळालच पाहिजे. ही उपासना ...ीच सुरु ठेवा. आता औदुंबराऐवजी घरातल्या देवांजवळ हे

निरांजन लावल तरी चालेल.' श्रीबाबा मोठ्या प्रेमाने मला समजावीत होते.

त्यांच्या कृपेने ही उपासना अजून सुरु आहे. ३८ वर्षांचा काळ संपन्न झाला आहे ! अशीच निरांजनाची उपासना करून चि. सौ. स्वातीला–मिलिंदच्या पत्नीला–आता **'नचिकेत'** नावाचा मुलगा झाला आहे ! चि. मिलिंद मूढमध्ये येऊन जेव्हा जेव्हा बोलतो, तेव्हा तेव्हा त्याचे डोळे निरांजनाच्या ज्योतीप्रमाणे चमकतात. चेहरा तेजाने उजळून येतो. वाणीतील स्पष्टता जाणवते. कोणत्याहि विषयाच आकलन त्याला झटकन् होत. भारतीय वायुसेनेत नोकरी करणाऱ्या ह्या युवकाला श्रीगुरुचरित्राबद्दल अपार ओढ आहे. माझ्या वडिलांची कै. ती. प.पू. श्रीदादांची श्रीगुरुचरित्राची पोथी 'इस्टेट' म्हणून त्याने जपून ठेवली आहे ! तो कुठेहि असला तरी आंघोळ झाल्यावर अर्धा तास त्याचं अह्निक चालू असतं. १८ पगड जातींचे त्याचे मित्र त्यावेळी आसपास बोलत असतात. 'अभी, मिल्याको डिस्टर्ब नहि करना। वरना खैर नहि।' त्याच्या मित्रांना त्याचा आधार वाटतो. कोणत्याहि प्रसंगात शांतपणे, सर्वांना बरोबर घेऊन, तो वाटचाल करतो; सर्वांच्या जीवनातील कानाकोपरा उजळून टाकण्याच, प्रकाशमान करण्याच, प्रेरक सामर्थ्य त्याच्या वाणीत आहे !

श्रीबाबा आता अनंतात विलीन झाले आहेत, पण निरांजन लावताना मला त्यांची रोज आठवण येते. माझे डोळे भरून येतात. हा प्रवास असाच सुरु राहील . . . प्रकाशातून . . . प्रकाशाकडे





## हांकेस शीघ्र प्रतिसाद, करी न कष्टी। भक्तासि, नित्य प्रतिपाळित कूर्मदृष्टी ॥

श्रीदत्तप्रभूंच्या **श्रीक्षेत्र गाणगापूर** (कर्नाटक) येथील सकाळ व संध्याकाळच्या आरतीच्या वेळी, भूत, समंध, पिशाच आदि बाधांमुळें त्रस्त झालेल्या, विविध तऱ्हेच्या, जातींच्या, पीडित व्यक्तींच्या अंगात संचार होऊन, त्या आरडा–ओरड करणे, रडणे, धांवणे, किंचाळणे, खांबावर चढणे, स्वतःला ओरबाडणे, मारणे, वस्त्र सोडून थयथयाट करणे वगैरे विविध तऱ्हेचे चाळे करताना आढळतात. इतर वेळी ह्या व्यक्ती बहुधा 'नॉर्मल' (सामान्य तऱ्हेने जीवन जगणाऱ्या) असतात. अशा व्यक्तींना बऱ्याच वेळा प्रदक्षिणांची सेवा सांगितलेली असते. काही सेवाभावाने श्रीदत्तप्रभूंचा दरबार (परिसर) झाडत असतात. काही दुपारी एकदाच मिळणारी तुटपुंजी माधुकरी खाऊन, दोन्हीवेळ नामस्मरणांत दंग असतात.

प्रतिदिन संचारमुक्त मंडळी घरीं परतत असतात. तशी संचारग्रस्त माणसे 'क्षेत्री' दाखल होत असतात.

**श्रीक्षेत्र मंत्रालय** (आंध्रप्रदेश) येथे प.पू. श्रीराघवेन्द्रस्वामी यांची संजीवन समाधी (वृंदावन) आहे. (महाराष्ट्रात अशी संजीवन समाधी आळंदी येथे संतश्रेष्ठ प.पू. श्रीज्ञानोबामाऊलीची आहे.) तुंगभद्रा नदींत स्नान करून श्रीदेवी यल्लम्माचे दर्शन करून, श्रीराघवेन्द्र स्वामींच्या समाधीला, ओलेत्याने, लोळत. पावलाला पाऊल

चिकटवून, साष्टांग नमस्कार घालत, सर्व कोपऱ्यावर साष्टांग
नमस्कार घालत आदि विविध तऱ्हेने प्रदक्षिणांची सेवा केली जाते.
बहुधा विविध प्रदक्षिणांचे नवस केले जातात आणि प्रसन्नचित्त होऊन
भक्त मंडळी ते फेडण्यासाठी प्रतिदिन तेथे जात असतात.

**श्रीक्षेत्र माणगाव** (सावंतवाडी जवळ) येथे साक्षात श्रीदत्तप्रभूंचे
७ वर्षे वास्तव्य होते. प.प. श्रीवासुदेवानंद सरस्वती (टेंब्ये)
स्वामीमहाराज तेव्हा गृहस्थाश्रमी होते. ते श्रीदत्तप्रभूंची मनोभावे
सेवा करीत असत. त्यावेळी रात्रौ, गुरुवारी, शनिवारी
आरतीच्यावेळी ६–७ हजार मंडळी सहज जमत असत. (त्याकाळांत
बैलगाडी हेच दळण–वळणाचे एकमेव साधन होते. पायी प्रवास हाच
सामान्य पर्याय होता.)

सारा परिसर भक्तिरसांत आकंठ बुडून जात असे. पिशाचादि
बाधा झालेले पीडित लोक देवळाच्या उजव्या, डाव्या भागात,
प्रदक्षिणाच्या वाटेवर, जमीनीत पुरलेल्या दोन लाकडी खांबांनी
चिकटून बसत असत.

आजहि ते लाकडी खांब विद्यमान आहेत. संकल्पपूर्वक दोन
खांबाना हात लावून, मंदिराला प्रदक्षिणा घालण्याची सेवा, दीर्घका
केल्यास, आजहि बाधापीडिताना फायदा होतो. मंदिराभोवताल
परिसर झाडणे, देवळाचा सभामंडप झाडून स्वच्छ करून, ओ
कपड्याने पुसणे, ह्या सेवा केल्यामुळे बऱ्याच श्रद्धावंतांच्या वि
समस्या दूर झाल्या आहेत. माणगाव श्रीदत्तमंदिराचा प
चैतन्यमय असल्याची जाण आजहि मिळू शकते. कसलाहि पू





न ठेवता तेथे जा. प. प. श्रीवासुदेवानंद सरस्वती (टेंब्ये) स्वामी-
महाराजांच्या कठोर साधनेने पूनित झालेल्या डोंगरावरील
महापुरुषाच्या गुहेतील, श्रीदत्तप्रभूंच्या पादुकांचे परममंगल दर्शन
घ्या. कळवळून हाक मारा. श्रीथोरल्या महाराजांना साद घाला.
प्रतिसाद नक्की मिळेल ! बोला, कधी येता माणगावला ?

★ ★ ★

## मनाची कवाडं उघडूं या

महाशिवरात्रीचा उत्सव ! पांगरे आश्रमांत भक्तांची भरपूर गर्दी
झाली होती. त्यांची पादत्राणं अस्ताव्यस्त पडली होती. कुठं तरी
ती एकत्र करून ठेवावीत, असा विचार करून दादा जाधव पुढे
झाला आणि पायाने ती तो एकत्र करू लागला. श्रीहरिहरेश्वर
मंदिरात नामस्मरण नीट चाललं आहे की नाही, हे पहायला गेलेले
श्री भाऊमहाराज तितक्यात, पाटाच्या बाजूने, वर आले. क्षणभर
दादाकडे पहात एकदम ओरडले, 'दादा, दादा काय चालवलं आहेस
हे ?' 'भाऊ, हे चपला–जोडे ...' चाचरत दादा पुटपुटला. 'ते दिसतय
रे मला. बाळा, अस करू नये. कोणाच्याहि चपलांना, जोड्यांना पाय
लावू नये.' श्रीभाऊमहाराज तथा श्रीशिवानंदस्वामी समजुतीच्या
स्वरांत दादाला म्हणाले. 'म्हणजे ?' दादा आश्चर्याने म्हणाला.

'दादा रे, माणसाचं व्यक्तिमत्व त्याच्या जोड्यांत सामावलेलं
असतं, म्हणून चपला, जोडे हाताने उचलून बाजूला ठेवावेत. कोणी
णाच्या पादत्राणाला पाय लावू नये.' दादाचे डोळे चमकले. आज
ला 'नवीन दृष्टि' मिळाली होती !

मला आठवतं. माझी आजी नेहमी म्हणायची 'चपलांचा आवाज होता कामा नये चालताना. चपला-बूट घासत चालू नये. त्यांना त्रास होतो. घरांत आल्यावर नीट पुसून ठेवावे त्यांना. दमलेले असतात ते.' ह्या दृष्टिकोनात दुसऱ्यांच्या कष्टांची कदर होती. पादत्राणं भरपूर टिकावीत; ती स्वच्छ राहावीत हा व्यवहारहि होता.

'भांड एकमेकावर आपटलं तर होणारा आवाज (नाद) जुन्या माणसाना आवडत नसे.' छबूमावशी म्हणाल्या. अगदी लगेच कोणीतरी म्हणे 'छबू, आधी तो नाद धर बघूं.'

'अगदी बरोबर, मावशी. भांड्यांना त्रास होऊ नये ह्या विचाराबरोबरच, घरांत भांड्यांचे आवाज होऊन कलहाला आमंत्रण मिळू नये, हा प्रधान हेतू त्यामागे असे. आज स्वयंपाक घरांतल्या बेसीनमध्ये वा मोरीत खरकट्या, लडबडलेल्या भांड्यांचा ढीग पडलेला असतो. मोलकरीण येईपर्यंत भांड्यांवरल अन्न सुकून त्यांना चिकटून बसत. ती खराब होतात. आपलं मूल असं शेंबडाने लडबडलेलं आपण ठेवू का बराच वेळ ?

'स्वामी, घरांतील सर्व गोष्टींवर आपला जीव हवा. त्याबाबत ममत्व हवं. मला आठवत. रात्री खरकटं स्वच्छ करून भांड्यांत पाण घालून ठेवायची पद्धत असे माझ्या माहेरी. शक्यतो, लगेच भां घासावीत; परंतु ते शक्य नसल्यास, ती नीट, नेटकी, स्वच्छ कर त्यांत भरपूर पाणी घालून ठेवण्याचा पूर्वी दंडक असे.'

'मावशी, भांड्यांना क्लेश झाले तर भांडी शापतात असं मा आजी म्हणे. सजीव, निर्जीवांबाबत सारखंच ममत्व होत म





गरीबीतहि, ती मंडळी उदारतेन सर्वांचे आगत स्वागत करीत. सर्वांना सारख्याच प्रेमान, ममत्वान वागवीत, म्हणून सुख, समाधान, शांतीच साम्राज्य त्यांच्या घरकुलात नांदत होत.'

डोंबिवलीला (पूर्व) राहाणारे माझे नातलग, ज्येष्ठ साधक श्री. वसंतराव आगटे आपल्या दैनंदिन पूजेनंतर घरांतील टी.व्ही., स्कूटर आदिंची दररोज पूजा करताता. त्यांना उदबत्ती, निरांजनाने ओवाळतात. प्रेमाने त्या वस्तूंवर हात फिरवतात. 'सर्वांना प्रेमाने सांभाळा रे' म्हणतात. गेल्या कित्येक वर्षांत, दुरुस्तीशिवाय, ह्या वस्तूंचा वापर त्यांच्या घरी होतो आहे. त्यांच्या घरातील स्कूटरला आजवर एकहि अपघात झालेला नाही !

'स्वामी, आता गॅस, फ्रीझ, गीझर, वॉशिंग मशीन, बरोबर कलर्ड टी.व्ही.हि आले . . . . सुखाची साधनं खूप झाली.'

'पण सुख रोडावलं, मावशी. साधनांनी, केवळ पैशांनी समाधान, आनंद, तृप्ती मिळत नाही. त्यासाठी प्रेमाने ओलेचिंब होऊन मनाची कवाड मोकळी करावी लागतात !'

★ ★ ★

## चित्त स्थिर कसें होईल ?

अभ्यासाबाबतची अनास्था, उद्योगधंद्याकडे बेपर्वाईने दुर्लक्ष, ारिक मतभेदांमुळे संसारातील संघर्ष आदि दैनंदिन जीवनातील ण-तणाव, दैन्य, नाहीसे करून, जीवन सुखमय, समाधानी ्यासाठी श्रीदत्तप्रभूंना, प.प. श्रीवासुदेवानंद सरस्वती, तुमच्या

आमच्या कल्याणासाठी, कळवळून साकड घालत आहेत. हे अत्यंत प्रभावी स्तोत्र आहे.

**अनसूयात्रिसंभूत दत्तात्रेय महामते।**
**सर्वदेवाधिदेव त्वं मम चित्तं स्थिरीकुरु ॥१॥**
**शरणागतदीनार्ततारकाऽखिलकारक।**
**सर्वचालक देव त्वं मम चित्तं स्थिरीकुरु ॥२॥**
**सर्वमंगलमांगल्य सर्वाधिव्याधिभेषज।**
**सर्वसंकटहारिन् त्वं मम चित्तं स्थिरीकुरु ॥३॥**
**स्मर्तृगामी स्वभक्तानां कामदो रिपुनाशनः।**
**भुक्तिमुक्तिप्रदः स त्वं मम चित्तं स्थिरीकुरु ॥४॥**
**सर्वपापक्षयकर स्तापदैन्य निवारणः।**
**योऽभीष्टदः प्रभुः स त्वं मम चित्तं स्थिरीकुरु ॥५॥**
**य एतत्प्रयतः श्लोकपंचकं प्रपठेत्सुधीः।**
**स्थिरचित्तः स भगवत्कृपापात्रं भविष्यति ॥६॥**

*॥ इति परमहंस परिव्राजकाचार्य श्रीवासुदेवानंद सरस्वति विरचितं श्रीदत्तात्रय स्तोत्रं संपूर्णम् ॥*

उदबत्ती, निरांजन (तुपाचे) प्रज्वलित करून, कुलदेव, कुलदेवता, माता–पिता, गुरुजनांचे, घरांतील गृहलक्ष्मीचेहि कृतज्ञतापूर्वक स्मरण करून, दूध–साखरेचा नैवेद्य अर्पण करून, प्रतिदिन सकाळी वा संध्याकाळी किमान ११ वेळा हे स्तोत्र म्हणावे. गरज पडल्यास दोन्ही वेळा म्हणावे.





गृहलक्ष्मीचे स्मरण वाचल्यावर तुम्हाला अचंबा का वाटला ? कृतज्ञता सर्वासंबंधी असावी. आपली गृहलक्ष्मी, सखी, पत्नी, माता, गृहिणी, सचिव, प्रिया, आदि विविध अंगांनी नटून आपला संसार सांभाळते. ह्या श्रीजगदंबास्वरूप गृहलक्ष्मीला अवश्य अभिवादन करायला पाहिजे. मी प्रतिदिन करतो. घर सर्वार्थाने समर्थ, समृद्ध, संपन्न, आनंदमय, मंगलमय असण्यासाठी गृहलक्ष्मीची प्रसन्नता अत्यावश्यक आहे. ★

## स्मरणमात्र संतुष्टाय . . . . .

रायगड जिल्ह्यात अलिबागजवळ धोकवडे येथे प्रतिवर्षी श्रीपंतमहाराज बाळेकुंद्रींचा जन्मोत्सव (पंतपाडवा) श्रावण शुद्ध प्रतिप्रदेला साजरा करतात. श्रीसेवा म्हणून मी तेथे प्रवचनास जात असे. २/३ वर्षांपूर्वी असाच मी उत्सवासाठीं–प्रवचनासाठी–तेथे गेलो होतो. सोबत माझे श्रीसद्गुरु प.पू. श्रीआबाजी बांदिकर हेहि होते. मी त्यांना म्हणालो, 'आबाजी, आज डोकं रिकामं आहे. काही सुचत नाही. काय बोलूं ह्या प्रेमळ भक्तमंडळींसमोर ?' 'काळजी नको. आनंदस्वामी, श्रीगुरुपरंपरा सार काही सांभाळेल. चांगलं होईल प्रवचन.' मी उत्सवस्थानी जाऊन श्रीपंतांच पूजन, वंदन केलं. श्रीआबाजींच्या चरणावर मस्तक ठेवलं, भारावलो होतो. डोळ्यांत काकुळती होती. माझ्या डोक्यावरून प्रेमळपणे हात फिरवीत श्रीआबाजी म्हणाले. 'नेहमी म्हणता ते श्रीदत्तप्रभूंचं '**मम चित्तं स्थिरीकुरु**' स्तोत्र म्हणा एकवेळ आणि करा सुरुवात.' मी

तस केल. सर्वांना विनम्र अभिवादन करून हात जोडले आणि म्हणालो. 'ॐ भवति भिक्षान्न देहि । अशी खणखणीत आवाजात, माध्याह्नी दारी, उभ्या असलेल्या तीन अतिथींनी, मागणी केली. श्रीअनसूयामातेने चमकून मागे पाहिल आणि .......' मी वर्णन करू लागलो. शद्बांच्या विविध सरी विविध प्रसंगांना सचैल स्नान घालू लागल्या. सार वातावरण भारावून गेल. श्रीदत्तावताराचा साक्षात्कार होऊन श्रोत्यांचे नेत्र पाझरू लागले. विविध अंगाने वळणे घेत प्रवचन संपले. साऱ्या वातावरणांत सुगंध, शांति, आनंद लहरत होता. कौतुकाने श्रीआबाजींचे डोळे भरून आले होते !

## हांकेस प्रतिसाद . . . .

डोंबिवलीच्या सौ. अपर्णा साने, डोळ्यांत पाणी आणून मला सांगत होत्या. 'तुम्हाला कल्पना नाही, स्वामी. माझी मोठी मुलगी कल्पना अत्यंत सालस, धार्मिक, कुणाचहि मन न दुखवणारी, पण .......'

'लग्न झालं. फार श्रीमंत नवरा मिळाला. पुण्याला वैभवात राहू लागली आणि तिची बुद्धि फिरली, हेच ना ?' मी चटकन् म्हणालो.

'अगदी खरं. माझ्यापेक्षा माझ्या यजमानाना ह्याचं फार, फार वाईट वाटतं. अत्यंत तोऱ्यात वागते. सर्वांवर तोंडसुख घेते. उपासना, साधना तर तिने केव्हाच सोडून दिली आहे. काय करायचं काय ?' सौ. अपर्णा रडवेली होऊन विचारत होती.

'श्रीकृपेने सर्व काही चांगल होईल. थोरल्या महाराजांच्या …





**चित्तस्थैर्य देणारे स्तोत्र** दररोज ११ वेळा म्हणायचं. उदबत्ती, तुपाचा दिवा, नैवेद्य वगैरे सर्व काही नेहमीप्रमाणे करायच. आपल्या आसनासमोर छोट्या आसनावर साखरेचं भांड ठेवायच. संकल्प करायचा सौ. कल्पनासाठी आणि १ वेळ स्तोत्र म्हणून झालं की, स्तोत्र म्हणताना उजव्या हातात धरून ठेवलेली चिमुटभर साखर, शेजारी ठेवलेल्या दुसऱ्या रिकाम्या भांड्यात टाकायची. (हे भांडहि नुसत जमीनीवर ठेवायच नाही, त्याखाली रुमालाची घडी वा आसन ठेवायच.) अभिमंत्रित साखरेचा पदार्थ करून ८/१० दिवसांनी पुण्याला तिच्याकडे पाठवायचा, तिला खायला सांगायचा. अस किमान ६ महिने करा. पुढच थोरले महाराज बघून घेतील.

अधून मधून सौ. कल्पना, आई–वडीलाना भेटण्यासाठी मुंबईस येऊ लागली. सौ. अपर्णावहिनींना तिच्या वागण्यातील इष्ट बदल जाणवू लागला.

एका संध्याकाळी सौ. अपर्णावहिनी माझ्याकडे आल्या आणि म्हणाल्या, सौ. कल्पनाने प.पू. श्रीनानामहाराज तराणेकरांचा फोटो, फ्रेम करून सासरी नेला असून तिची साधना, उपासनाहि आता सुरु झाली आहे. स्वामी, तुमच्यामुळे हे घडलं. त्यांचे डोळे पाणावले होते.

'चुकता आहात तुम्ही, वहिनी. हे सार तुमच्या श्रद्धा, भक्ति आणि चिकाटीमुळे झालं. आनंद आहे. काय, हांक मारली की प्रभु धावतो ना ?'

## सन्मानानें संकटमुक्ति . . . .

'पार्टी नामांकित आहे. मार्केटमध्ये पार्टीला पत आहे. पार्टीचे भरपूर ॲसेटस् आहेत वगैरे सर्व – सर्व पाहूनच पार्टीला ७२ लाख रुपये देण्याची सूचना मी केली.'

'आणि आतां पार्टी गाशा गुंडाळून गेली ! असंच ना ?' मी म्हणालो. विजय दास्ताने आश्चर्याने माझ्याकडे बघत राहिला.

'अरे, मकरंद ऐकून तर घे. माझ्या वरच्या सर्व मोठ्या ऑफिसर्सनी चौकशी करूनच माझी सूचना मान्य केली.' विजय म्हणाला.

'मग तू चिंतातूर का ? आता पार्टी कुठे आहे ?' मकरंद उलट तपासणीच्या आविर्भावात म्हणाला.

'लंडनला ! पैसे पाठवतो. तू काळजी करू नकोस. असं फोनवर सांगतो. 'आय् वील ऑनर माय कमीटमेंटस्', असं बँकेलाहि लिहितो.'

'प्रत्यक्षात काही घडत नाही. आतां सर्वांनीच तला 'टारगेट' केलयं (लक्ष बनवलंय) बळी द्यायला तू बरा आहेस.' मकरंद चिडून म्हणाला.

'काहीहि सुचत नाही. मी कुठेहि चुकलो नाही, पण स्वास्थ नाहि रे. दोन ऑफिसर्स बँक सोडून गेले. माझी बँकेच्या हेडऑफिसला आबुदाबीला–बदली करण्यात आली आहे. काय करू रे ?' विज अस्वस्थपणे म्हणाला.

'सब ठीक हो जायेगा. श्रीदत्तप्रभूंचं चित्तस्थैर्य देणारे स्तोत्र म





रोज ११ वेळा आबुधाबीला. रणांगण सोडून पळायचं नाही. चलो आगे बढो.' मकरंद त्याला धीर देत म्हणाला.

श्री. विजय दास्ताने आबुधाबीला गेला. त्याने न चुकता तेथे दत्तस्तोत्राची उपासना केली. केसची चौकशी झाली. काही अधिकाऱ्यांना चार्ज–शीटस् देण्यात आली. काहीनी राजिनामे दिले. विजय सन्मानाने त्या केस मधून सुटला. इतकंच नव्हे तर २ वर्षांनी वरच्या जागेवर त्याची निर्युक्ती झाली. त्याचा वैचारिक तोल कुठेहि गेला नाही. अलिकडे ......... १९९३ साली, भरपूर पैसे कमावून, विविध वस्तू खरेदी करून, नोकरी सोडून, तो सन्मानाने मायदेशी परतला आहे. पुण्यात स्थायीक झाला आहे !

## सर्वासी तारक दत्तनाम . . . . .

'रडून काहीहि होणार नाही. त्याचं नशीब नी तो. तुम्ही कां खंत करता अनघावहिनी ?'

'अहो, अरुण भावजी, तुम्हाला ते नाही कळणार. मी माझ्या भाच्याला–मुलासारखा वाढवला आहे. तो तसा आतताई नाही.'

'मग वडिलांबरोबर त्याचे वारंवार का खटके उडत होते ? अभ्यास करायला नको; उंडारायला पाहिजे. मोठी माणस बोलली की .......'

'माझ्या वसुधाताईचे यजमान–विनायकराव–खूपच संतापी. कदा का बोलायला लागले, की मग मागचा पुढचा विचारच रणार नाहीत.'

'आणि म्हणूनच त्याला कंटाळून त्यांचा मुलगा प्रणव घर सोडून निघून गेला.'

'ते काहीहि असलं तरी तो घरी परत आला पाहिजे. हव तर मी त्याला माझ्या घरी ठेवीन. माझे यजमान मला, नाही म्हणणार नाहीत. नाहीतरी मला मेलीला मूलच ........' आणि त्यांना हुंदका फुटला.

अरुण करंदीकर अस्वस्थ झाले. 'बर, बर मी आनंदस्वामींना भेटून येतो, संध्याकाळी.' घरी येऊन त्यांनी मला सर्व हकिगत सांगितली. मी त्यांना, प्रणव घरी परतण्यासाठी, संकल्प लिहून दिला. तो जेथे कुठे असेल तेथून स्थिर–चित्ताने तो आपल्या घरी परतावा. असा संकल्पाचा आशय होता. सौ. अनघावहिनींनी संकल्पपूर्वक दररोज ११ वेळा श्रीदत्तप्रभूंच **चित्तस्थैर्य करणारे**
**स्तोत्र** म्हणण्यास सुरुवात केली. प्रणवने चिडून घर सोडले **ते**
कुणाचीहि मदत न घेण्याच्या जिद्दीने. ठाणे–पनवेल–खोपाली **येथे**
काही काळ वास्तव्य करून त्याने कष्टाची कामे केली. **दिवस**
ढकलले. खोपोलीच्या एका हॉटेलात तो कामकाज करू **लागल**
पूर्व संस्काराप्रमाणे तो रात्रौ झोपताना देवाची प्रार्थना करी. **त्यावेळ**
त्याचं ऊर भरून येई. कुणी तरी आपल्याला घरी बोलावतो **आ**
असं त्याला वाटे. आईची आठवण येई. मावशीची आठवण **ये**
धाकट्या बहिणीचा–जाईचा–रडवेला चेहरा त्याच्या **नजरेसम**
येई. तो उदास होई. सकाळी उठला की कामाला लागे. **सुमारे**
महिन्यांचा काळ उलटला. वानखेडे स्टेडियमवर एक क्रिकेट–





बघण्यासाठी तो मित्राच्या आग्रहाने आला. स्टेडियमवर प्रवेश करतो तो समोर त्याचा चुलतभाऊ दत्त म्हणून उभा. दोघांनी एकमेकांना मिठी मारली. 'प्रणव, तू घरी चल. तुला कुणीहि काही बोलणार नाही.' अविनाश भरल्या डोळ्याने म्हणाला.

'येतो रे. पण अगोदर आपण अनघामावशीकडे, दादरला पालनजी सोजपाल चाळीत जाऊं. नंतर ठाण्याला घरी जाऊ.' प्रणव पुटपुटला.

प्रणव–अविनाश संध्याकाळी अनघामावशीकडे गेले. टी.व्ही. वरला अभंग त्यांच्या कानावर येत होता.

**'असो यातिहीन, असो मतिहीन ।**
**सर्वासी तारक हरिनाम ॥'**

प्रणवने खोलीत प्रवेश केला. समोर अनघामावशीला पहाताच
घाच्या भावनेचा बांध फुटला. 'मी चुकलो, मी चुकलो,' म्हणत
ाने मावशीच्या पायावर डोकं ठेवलं. त्याला उठवून पोटाशी घेत
िनी म्हणत होत्या, 'माझ्या लेकरा, कुठं रे गेला होतास आम्हाला
हून ?'
त्यांच्या डोळ्यांतून अविरत अश्रू वहात होते. टी.व्ही.वर आरती
ळीकर गात होत्या.....

**भावे उद्धरण सकळासी** ऽ ऽ . . . . . . .'

★ ★ ★

## जें पेराल तेंच उगवेल

'अगदी बरोबर. आता तुम्ही माझे फक्त रु. १०००/- च देण लागता.' डायरी पहात काळेसाहेब म्हणाले.

'हे तुमचे रुपये एक हजार. आता आपला लौकिक व्यवहार मिटला. मी कर्जमुक्त झालो.' पैसे देत दाबके मोठ्या खुषीने म्हणाले

काळेसाहेबांनी मान डोलावली. दाबकेंनी पुढे केलेल्या वहीव त्यांनी पावतीहि लिहून दिली.

'काळेसाहेब, मला वहिनींना भेटायचय्.'

'अवश्य, अग ए ऽ, जरा बाहेर ये.'

काळेवहिनी चहा घेऊनच बाहेर आल्या.

'हे आनंद दाबके.' काळेसाहेब माझी ओळख करून देत म्हणा

'तुमचा उल्लेख नेहमी काळेसाहेबांच्या बोलण्यात व्हायचा. अ प्रत्यक्ष भेटीचा योग आला. छान ! उभे कां ? बसा ना.' काळे व म्हणाल्या. आम्ही चहा घेतला. मी उभा राहिलो. 'पैसे कोणाब तरी पाठवता आले असते, पण मी स्वत:च आलो. व्यवहार झाला. आता नमस्कार बाकी आहे.' मी भारावून म्हणालो.

'नमस्कार ? कसला ?' काळेवहिनी आश्चर्याने म्हणाल्या.

'वहिनी, मी खास तुम्हाला नमस्कार करायला आज आलो सदिच्छा दिली तर ती नक्की फलद्रुप होते. हे तुमच्या कृती झालं आहे. चांगुलपणावरचा माझा विश्वास दृढ झाला. त्याल कारणीभूत आहांत, म्हणून कृतज्ञतापूर्वक नमस्कार.' मा





पाणावले होते. काळेसाहेबांनाहि मी नमस्कार केला. अत्यंत प्रसन्न मनाने मी विलेपारले रेल्वे स्टेशनकडे वळलो.

'२०/२२ वर्षांचे माझे स्नेहसंबंध तुटण्याच्या अवस्थेत आले होते. धंद्यासाठी रु. ७०००/- काळेसाहेबांनी मला हात-उसने दिले, मी नको म्हणत असताना. पुढे मी त्याचं व्याजहि देवू शकलो नाही. मूळ रक्कम देणे मुष्कील झालं. संबंध ताणले गेले. काळेसाहेबांनी खूप कटू शब्द वापरले. मी मनस्वी व्यथित झालो, पण पैसे देण्याचा प्रश्न पैसे देवूनच सुटतो, आश्वासने नाही ! मी पैसे देत नव्हतो आणि आश्वासनहि (खोटं) देत नव्हतो !!

काळेवहिनी एका सकाळी आपल्या पतिराजाना म्हणाल्या 'अहो एकीकडे सांगता, आनंद दाबके हा सज्जन माणूस आहे. तो पैसे बुडवणार नाही. दुसरीकडे रोज त्यांच्यावर वैतागता कां ? आता हा प्रश्न मी सोडविते. तुम्ही मध्ये पडायचं नाही. दाबकेना फोनहि करायचा नाही की भेटायचहि नाही. कबूल ?'

दुसरे दिवशी त्यांनी देवांच्या उजव्या बाजूला एक पाणी भरून कलश ठेवला. त्यांत २५ पैशांचं एक नाणं व सुपारी घातली. वर ...रसूफ केलेला, पाण्याने स्वच्छ धुतलेला नारळ (श्रीफळ) ठेवला. ...फळाला व कलशाला हळद-कुंकू लावले. उदबत्ती, निरांजनाने ...वा ओवाळून, दूध-साखरेचा नैवेद्य अर्पण केला. प्रार्थना केली. 'हे ...वत्सल प्रभु, श्री. आनंद दाबके ह्या सज्जन गृहस्थाला तू सर्वार्थाने ...कर. त्याच्या कुटुंबियांच्या दैनंदिन सर्व गरजा सन्मानाने पुऱ्या ...ची त्यांना क्षमता दे. त्यांना त्यांच्या उद्योगव्यवसायांत

सन्मार्गाने विपुल धन मिळू दे. ते सज्जन असल्याने, आमचे पैसे देण्याची त्यांची दानत आहे. त्यात त्यांना यश दे. ज्या प्रेमाने, आपुलकीने पैसे देण्याचा व्यवहार झाला. त्याच भावनेने, कटुता निर्माण न होता, पैसे परतफेडहि होऊ दे. उभयपक्षी, 'यश, श्री, सदानंद' प्राप्ती होऊन, कल्याण होऊ दे.' दररोज देवांची पूजा झाल्यावर सौ. काळेवहिनी श्रीफल-कलशपूजा करून **नैवेद्य** समर्पणानंतर रोज श्रद्धाभक्तियुक्त अंत:करणाने प्रार्थना करीत राहिल्या.

एक महिन्याचा काळ लोटला. मी रु. ३००/- मनिऑर्डरने पाठ शकलो. नेमके ते त्यांना मिळाले प्रार्थनेला पूर्ण महिना झाला त्य दिवशीच ! पुढे वर्षभरांत मी त्यांना जवळ जवळ अडीच हजार स दिले आणि १९८० च्या सुमारास घडलेला हा व्यवहार २५-१०- ला उभयपक्षी सन्मानाने संपन्न झाला.

त्यांच्या समजूतदार, मंगल, प्रेरक विचार प्रक्षेपणाने, सदिच्छ आशीर्वादाने मलाहि उर्जितावस्था आली आणि मी पुन्हा व्यव उभा राहिलो, खंबीर आत्मविश्वासाने ! १५ ऑक्टोबर १९ मी माझ्या सर्व लौकिक ऋणांतून मुक्त झालो. वाडवडि शुभाशीर्वाद, श्रीसद्गुरुपरंपरेची असीम कृपा आणि काळेवहिनींसारख्या अनेकांचे शुभाशीर्वाद ह्यामुळे हा सो दिवस उगवला. ह्या साऱ्यांना मी काय देवू ? हा विचार मनी ये त्या वेळी कृतज्ञतेने माझे डोळे पाझरू लागतात. ते अश्रू पु भानहि मला राहात नाही.





## दिव्याने दिवा लावा . . .

दिव्याने दिवा लावला तर . . . आनंद, आत्मविश्वास दुणावतो. हाच सफल प्रयोग करून मुंबईमधील श्री. जयंत जाधव ह्या उद्योगपतीचे, कोर्टाकडे जाणारे प्रकरण थोपवून, रु. ९० हजार एक रकमी वसूल झाले. श्री. जाधवसाहेबांच्या एअरकंडिशन्ड केबिनमध्ये आतां देवांसाठी स्वतंत्र स्थान निर्माण झाले आहे. परमेश्वराला मानणारा आणि हात जोडणारा एक कर्तबगार तरुण आत्मविश्वासाने धंद्यात उभा राहिला आहे !! ★

## लग्नाला जातो मी . . .

लग्न हे वधुवरांच्या बाबतीत फार मोठे स्थित्यंतर आहे. जीवनाची आगळी वेगळी बाजू प्रकाशात येऊन, त्यामुळे सर्व वनच अमूलाग्र बदलण्याची शक्यता निर्माण करणारे त्यंतर ! सर्वसाधारणपणे विवाह मुहूर्त बघितला जातो. मान्यपणे त्यावेळी लग्न लावण्याचा प्रयत्न असतो. सहसा तला जात नाही तो वरात **वराच्या घरीं** येऊन **गृहप्रवेश** **ण्याचा मुहूर्त** ! तो आवर्जून पहावा व कटाक्षाने त्याचवेळी रठ्यावरील माप लोटून, गृहलक्ष्मीने घरात प्रवेश करावा. वेशाचा मुहूर्त पहाणे नक्कीच सुमंगल, सुफलदायी ठरेल. दुळ ही कलियुगांतील खरी लक्ष्मी आहे. गृहप्रवेशाच्या पहिल्या णांत संपन्नतेचं आश्वासन देवूं इच्छिणाऱ्या गृहलक्ष्मीने मग मीला चरणस्पर्श कसा करावा ? त्यासाठी उंबरठ्यावरील

मापांत गहू, ज्वारी, बाजरी (काहीहि एक) ठेवावी आणि सर्वांगीण वैभवासकट मोठ्या सन्मानाने गृहलक्ष्मीने गृहप्रवेश करावा. अर्थात हे सारे प्रतिकात्मक आहे. पावला पावलावर सुख, समृद्धि, आनंद, तृप्ती, समाधान, धन, धान्य, गोधन, सुसंस्कार, शालीनता, मंगलमयता, चारित्र्यसंपन्नता आदिंची उधळण करीतच गृहलक्ष्मी घरांत यावी. नांदावी आणि वर्धिष्णु राहावी अशी त्यामागची शुभकामना आहे.

लग्नाला वऱ्हाड नेताना आणि वरात घराकडे वा इतरत्र नेताना त्या वहानांत दर्शनी भागात किमान एक तरी **वीर हनुमंताचे चित्र, फोटो** **स्टीकर** असावा. अशा वहानाला अपघात होत नाही, असा अनुभ आहे.

वैवाहिक आघाडीवर अतृप्त राहिलेले आत्मे बहुधा वऱ्हाडच गाड्यांना अपघात घडवतात, म्हणून वीर मारुतीला शरण जाणे त्याचे पूजन, वंदन, नैवेद्य समर्पण यथासांग करावे आणि निर्भय वहानांत बसून म्हणावे 'लग्नाला जातो मी द्वारकापुरा . . .'

## पितृदोष कसे जातील ?

**(कायिक, वाचिक, मानसिक, बौद्धिक, आर्थिक आदि)**

सर्वांगीण जीवन सुखी, समाधानी, आनंदी करण्या घरांतील कर्त्यापुरुषाच्या पुण्यतिथीदिनी, तिथीने श्राद्ध, पि आदि करण्याची पुरातन प्रथा आपणाकडे आहे. ब्राह्मणाद्वारे, भोजन देऊन, शक्य असेल त्या सामुग्री





धार्मिक कृत्य अवश्य करावे. देशकाल–परिस्थितीमुळे ते शक्य नसेल तर चटश्राद्ध (थोडक्या विधीने करावयाचे श्राद्ध) करावे. तेहि करणे खूप अडचणीचे असेल तर त्या तिथीला आचारसंपन्न, योग्य ब्राह्मण बोलावून संकल्पपूर्वक त्याला दूध–साखर, फळे, मिठाई, शिधा (शक्य असले तर), दक्षिणा समर्पण करावी. सर्वांनी भावपूर्ण साष्टांग नमस्कार करावा. (महिलांनी, त्यांच्या नेहमीच्या पद्धतीने नमस्कार करावा.)

श्राद्ध ह्या शद्बाचा अर्थच मुळी श्रद्धेने केलेले कृत्य असा आहे. वरील सर्व विधींमध्ये पितरांसंबंधी अपार कृतज्ञता व्यक्त करणे, हा प्रधान हेतू आहे. दैनंदिन जीवनांतहि बिछान्यात उठून बसल्यावर हात जोडून लक्ष्मी, सरस्वती, गोविंद यांना वंदन आणि जमीनीला पदस्पर्श करण्यापूर्वी, पृथ्वीमातेला वंदन करण्याची प्रथा आहे; ती विनम्र भावाने, अपार कृतज्ञतेनेच.

स्नानोत्तर पूजा करताना वास्तूपूजन (त्याबाबत स्वतंत्र लिहिले आहे, ते कृपया पहावे.) झाल्यावर संस्कृत म्हणता येत नसेल तर क प्राकृतांत–गद्यांत–म्हणावे.

"ताटके (प्रत्येकाने आपल्या कुळाचा उच्चार करावा.) कुळांतील पुरुष, त्याची स्त्री–पुरुष परंपरा, सकलगुरु परंपरा, माता–पिता त असल्यास), विद्यमान असल्यास त्यांना सर्वप्रथम, स्वतंत्र, ांग नमस्कार करूनच पूजेस सुरुवात करावी. (माता–पिता- ार्य यांचे स्थान आपल्या जीवनांत अनन्यसाधारण आहे.) ग्राम ा श्रीमहालक्ष्मी, श्रीमुंबादेवी (भागांतील दैवत), श्रीकाळबादेवी

(विभागातील दैवत), ग्रामदेव श्रीबाबुलनाथ, श्रीवाळकेश्वर, श्रीभुलेश्वर, स्थानदेवता, इष्टदेवेता, वास्तूदेवता आदि ज्ञात व अज्ञात सर्व शक्ति मजवर सदैव प्रसन्न राहून मला व माझ्या सर्व गोत्रजांना वर देणारी, आशीर्वाद देणारी होवो.'' हे कृतज्ञता – स्मरण म्हणजेच दैनंदिन श्राद्ध ! पूर्वीहि दिनश्राद्ध (नित्यतर्पण) करण्याची पद्धत होतीच.

दर अमावास्येला सर्व पितरांना तृप्त करण्यासाठी तिळ-जलद्वारे तर्पण करण्याची प्रथा आहे. त्यावेळी खालील प्रार्थना करून तर्पण करावे.* 'माझ्या ह्या आणि पूर्वीच्या जन्मातील पितृकुळीचे, तसेच मातृकुळीचे, स्वर्ग, ब्रह्म वा विष्णुलोकांतील द्वारी तिष्ठणारे, मृत्यूलोक, पाताललोक वा अधांतरी स्थितींत इतरत्र वावरणारे स[illegible] पितर, बांधव, नातलग, इष्ट, मित्र, शुभचिंतक, मूलत: सज्ज[illegible] असलेले, परंतु कारणपरत्वे हितशत्रू झालेले, गोत्रजांतील पुत्रही[illegible] अपत्यहीन, गृभावस्थेत, अर्धवट अवस्थेत, मृत झालेले वा मृ[illegible] जन्मलेले, जन्मून लगेच मृत झालेले, ब्रह्मचारी, जपि, तपि, ऋ[illegible] मुनी आदि सर्वा सर्वांना मी देत असलेल्या तिलोदकाने संतुष्टता [illegible] लाभो. ते मुक्त होवोत.' अशा प्रार्थनेला अवश्य प्रतिसाद मिळेल.

वर नमूद केल्यापैकी काहीहि करणे जमत नसेल तर [illegible] संकल्पासह प्रतिदिन थोडे थोडे, न चुकता पाणी व अन्नदान कर[illegible] पितरांचे स्मरण करून करा. इतर काहीहि करूशकत नसल्या[illegible] त्यात क्षमा याचना असावी. पितरांची नाराजी कमी होण्यास [illegible] मदतच होईल. (* पान ९९ पहा)





वरील धर्मकृत्ये कोणी एक बंधू करीत असेल तर अन्य भावांचे सक्रिय साहाय्य, नुसते पैसे पाठवून भागणार नाही, त्याला मिळणे अगत्याचे आहे. अन्यथा जो शेत पिकवतो, त्यालाच त्याचा खरा लाभ होईल.

हे भावपूर्ण कृत्य आहे. कंत्राट देवून उरकावयाचा हा समारंभ नव्हे.

पितृदोषामुळे दैनंदिन भावनिक संबंधात्त घरी व दारी तणाव-असंतुष्टता, अपत्यहीनता, सदोष अप्रत्ये, शरीरसुखांत असमाधान, तणाव, लौकिक प्रगतीत बाधा, यशप्राप्तीत अडथळे, कायम स्वरूपाचे आजार, मानसिक विकृतीयुक्त नातलगांची सेवा वा सुश्रुषा करण्याची जबाबदारी आदि संकटांनी त्रस्त व ग्रस्त होण्याची वेळ येते.

अत्यंत धावपळीच्या शहरी जीवनांत दैनंदिन अन्न, उदक, दान करणे कसे जमेल ? हा तुमचा चेहऱ्यावरील प्रश्न न सांगताच मला कळला. सुयोग्य अनाथाश्रम, वृद्धाश्रम, अंधबाल–बालिकांच्या संस्था, अपंगांच्या संस्था आदिंचा शोध घेऊन त्यांच्या कार्याची पूर्ण माहिती मिळवून, खरेपणा तपासून, दरमहा धान्य, दूध, फळे, साखर, [illegible]ळ, डाळी आदि पदार्थ तुम्ही तेथे अर्पण करू शकता; दर्शनी नोटीस [illegible]र्डावर तुमच्या नावाचा उल्लेख टाळून ! काही संस्था बाहेरून [illegible]ार करून आणलेले खाद्यपदार्थ हल्ली स्वीकारीत नाहीत, [illegible]एवजी देणगीदाराकडून संपूर्ण खर्च घेऊन तो पदार्थ स्वत: बनवून [illegible]तात. वितरणाच्यावेळी स्वत: उपस्थित राहून ती तृप्त बालके,

स्त्रिया, वृद्ध पहा. त्यांच्या डोळ्यांत अपार कृतज्ञता असते. तुम्ही जर थोडे अंत:मुख झालात तर तुमच्या लक्षांत येईल. आपण फारसे काहीहि करीत नाही. 'दिल्यानेवाल्याकडे' थोड दुर्लक्ष होऊन 'देनेवाला' त्याचं श्रेय घेत असतो कां ? सर्वशक्तिमान, दयाघन प्रभूच्या प्रेरणेने हे सारे घडते; आपण निमित्तमात्र आहोत. कृतज्ञता त्याच्याबद्दलच असायला हवी, खरं ना ?

★ ★ ★

## पितरांचं तर्पण

जीवन सुखी करण्यासाठी पितरांचे तर्पण करणे, हा प्रभावी उपाय आहे. हे करण्यामागे अपार कृतज्ञता आहे. पितरांना तृप्त करण्यासाठी खालील चार मंत्रांनी दर अमावास्येला तर्पण करावे. पुष्कळदा पितर अतृप्त राहिल्यामुळे घरांत शांति नांदत नाही. घराची भरभराट होत नाही. धार्मिक श्राद्ध करणे हेहि जरुरीचे आहे. अमावास्येच्या तर्पणाने बराचसा कार्यभाग साधेल.

प्रथम आचमन करून (दोनदा) प्राणायाम करून अपसव्य करावे (म्हणजे जानवे डाव्या खांद्यावरचे उजव्या खांद्यावर घ्यावे.) नंत भांड्यात, काळेतिळ-मिश्रित पाणी घेऊन अंगठ्यावरून (उजव्य हाताच्या) पितरांना उदकधारा अर्पण करावी. (ज्यांचे आई-वडी हयात असतील त्यांनी उजवा हात उताणा करून चारहि बोटे जुळ त्यावरून उदकधारा अर्पण करावी.) उदकधारा सोडत म्हणावयाचे मंत्र खाली नमूद करीत आहे.





* ॐ आब्रह्मस्तंब पर्यन्तं देवर्षिपितृमानवा: ।
तृप्यन्तु पितर: सर्वे मातृमातामहादय: ॥१॥
अतीतकुलकोटीनां सप्तद्विपनिवासिनाम् ।
आब्रह्मभुवनाल्लोकादिदमस्तु तिलोदकम् ॥२॥
येऽबान्धवा बान्धवा ये येऽन्य जन्मानि बांधवा: ।
ते सर्वे तृप्तिमायान्तु मया दत्तेन वारिणा ॥३॥
ये के चास्मत्कुले जाता अपुत्रागोत्रिणा मृता: ।
ते गृहणन्तु मया दत्तं वस्त्रनिष्पीडनोदकम् ॥४॥

पितरांसंबंधी पूर्ण आदर ठेवून, पूर्ण श्रद्धेने हे तर्पण करावे. पितरांच्या मंगल आशीर्वादासह सर्वांगीण संपन्नता, प्रसन्नता लाभेल. 'श्री' आज्ञेने, विनम्र चित्ताने हे सुचवित आहे. अनुभव घ्यावा.

ज्यांना संस्कृत श्लोक म्हणणे जमणार नाही त्यांनी पूर्वी नमूद केलेली प्राकृत प्रार्थना म्हणावी. (* पान ९६ पहा)

★ ★ ★

## यशवंत होण्यासाठीं .....

'श्रीसद्‌गुरूंनी दिलेली उपासना-साधना नीट, नियमीत होत नाही.' 'अभ्यासात मनच लागत नाही, काका.' 'ऑफिसमध्ये कामात वारंवार चुका होतात, बोलणी तरी किती ऐकायची साहेबाची ?'

'धंद्यात नीट लक्ष देण जमत नसेल तर .... आता गंभीरपणे विचार करावा लागेल, पार्टनरशीप ठेवायची की नाही ?'

'लेक्चर तयार करून वर्गावर गेले, पण विद्यार्थ्यांसमोर ते प्रभावी होत नाही, किती तरी मुद्दे राहून जातात, काय करावं?' ह्या आणि अशा स्वरूपाच्या कितीतरी तक्रारी मला दररोज ऐकाव्या लागतात. उपासनेबाबत मला स्वत:ला अडचणी आल्याच की. माझे श्रीसद्गुरू प. पू. श्रीआबाजी बांदेकर यांनी मला दिलेल्या, श्रीदत्तप्रभुंच्या प्रार्थनेतील कडव्याने मला लाभ झाला.

**'सर्व इंद्रिये आणि मन हें तुझें हातीं आहें ।**
**यास्तव आतां तूं लवलाहे स्वपदीं मन रमवावें ॥'**

संकल्पपूर्वक, स्वस्थचित्ताने, श्रध्दाभक्तियुक्त अंतःकरणाने, आसनस्थ होऊन, नेहमीच्या पध्दतीने उदबत्ती, निरांजन, नैवेद्य आदि कर्मेकरून, वरील प्रार्थनेचा किमान १५ हजार जप करावा, नंतर [illegible] प्रार्थना १५ वेळा म्हणावी. ही उपासना किमान ६ महिने करावी.

प्रार्थना फलद्रुप झाल्याशिवाय कशी बर राहील ?

★

## सोन्याचे दागिने लाभदायक कसे होतील ?

गुरुपुष्य योगावर, यथाशक्ति सोने खरेदी करीत जावे. शक्य त त्याच योगावर दागिने घडवावेत. (किमान सुरुवात तरी करावी) निःसंशय लाभदायक ठरतात. अनुभव असा आहे की, ते स गहाण टाकावे लागत नाहीत वा विकावे लागत नाहीत. प्रदीर्घ कु टिकतात. किती तरी लोकांचा हा अनुभव आहे. त्या योगावर, गुरु अत्यंत सात्विक स्थितीत असतात. ते प्रसन्नता देतील. ज्या





दागिने द्याल ते खूष होतील. त्यांची भरभराट होईल. पुष्य हे दीर्घकालावधि देणारं शनीचं नक्षत्र आहे. माझ्या वडीलांनी (कै. ती. श्री. रा. रा. भिकाजीपंत तथा दादा ताटके यांनी) गुरुपुष्य योगावर थोडं थोडं सोनं घेऊन माझ्या दोन्ही बहिणींना सोन्याच्या बांगड्या केल्या. गेली ४५ वर्षे समाधानाने त्या बांगड्या वापरत आहेत. माझी आई ज्या सोन्याच्या पाटल्या वापरत असे त्यातील थोडं थोडं सोनं, 'आशीर्वादाचं सोनं' म्हणून, मी माझ्या सूनांच्या दागिन्यांत घातले आहे. त्याहि आनंदाने, समाधानाने, त्यांचे दागिने वापरत आहेत. दागिने जितके महत्त्वाचे त्यापेक्षा जास्त महत्त्वाचे काय ? आनंद, समाधान, तृप्ती आणि त्यायोगें येणारी समृद्धि !

★ ★ ★

## नेत्रदीपक यशासाठी . . .

**'ॐ आदिदेव नमस्तुभ्यम् प्रसीद**
**मम भास्कर।**
**दिवाकरं नमस्तुभ्यम् प्रभाकर नमोऽस्तुते ॥'**

देवांजवळ रांगोळीनें श्रीसूर्य काढावा. त्याला गंध, पांढरे फूल, अष्टगंध वहावे. दूध-साखरेचा नैवेद्य अर्पण करावा आणि संकल्पपूर्वक दररोज ७ वेळा वरील मंत्र थोडा मोठ्याने म्हणावा. **संकल्प असा असावा.** 'हे, दैदिप्यमान, महातेजस्वी, महापराक्रमी, प्रतिभासंपन्न, महाबुद्धिवान सूर्यदेवा, तुझी अखंड कृपा मला लाभो आणि माझे आणि माझ्या कुटुंबियांचे जीवन सर्वार्थाने संपन्न, समृद्ध,

मंगलमय, आनंदमय, प्रेरक, शीलवान, आरोग्यसंपन्न होऊ दे.'

व्यवसाय–उद्योग, नोकरी, शिक्षण, प्रापंचिक आणि पारमार्थिक जीवन आदिमध्ये सर्वांगीण धवल, नेत्रदीपक यश प्राप्त होते.

★ ★ ★

## व्यवसाय – नोकरी मिळावी म्हणून . . .

श्रीमंगलमूर्तींना अनन्यभावे शरण जावे. नेहमींचे सर्व उपचार करून गुळखोबऱ्याचा नैवेद्य अर्पण करावा. 'सन्मार्गाने उदरभरण करून माझे व माझ्या कुटुंबीयांचे जीवन सर्वार्थाने संपन्न, आनंदमय, मंगलमय व्हावे म्हणून प्रसन्न व्हा आणि तुम्हाला योग्य वाटते तो व्यवसाय–उद्योग लवकरात लवकर मला मिळवून द्या. निरंतर तुमची चरणसेवा द्या.' असा संकल्प करून खालील मंत्र दररोज १०८ वेळा २१ दिवस करावा. त्यानंतर ६ महिने दररोज २१ वेळा तरी म्हणावा. उज्वल यश लाभेल. मंत्रोच्चार स्पष्ट करावा. आपला मंत्र आपल्याला ऐकू येईल, इतपत आवाज मोठा असावा. मंत्र मोठ्याने म्हटल्या वाचा, तनुशुद्धि बरोबरच वातावरण शुद्धिहि होईल.

**'ॐ श्रीं गं सौम्याय गणपतये ।**
**वरवरद सर्वजनम् मे वशमानय स्वाहा ॥'**

भगिनींनी 'अडचणीच्या ५ दिवसांत' हा मंत्र म्हणू नये.

## दावी, दावी सोहळे सामर्थ्याचे

संत स्वत:साठी काहीहि मागत नाहीत. मागणे त्यांच्या





नसतेच. कळवळले, व्याकूळ झाले की जे मागतील, ते सर्व जगासाठी ! जगाच्या कल्याणासाठीच. एरव्ही म्हणतील . . . .

**'मागणें तें मागो देवा ।**
**करूं भक्तिभावें सेवा ॥'**

एका बालकाच्या मृत्यूने कासाविस होऊन तुकोबारायांनी विठ्ठलाला साकडे घातले.

**'अशक्य तें तुम्हां नाहि नारायणां ।**
**निर्जीवा चेतना आणावया ॥**
**मागें काय जाणो स्वामीचे पवाडे ।**
**आतां कां रोकडे दावूं नये ॥१॥**
**थोर भाग्य आम्ही समर्थाचे कासे ।**
**म्हणवितो दास काय थोडें ॥**
**तुका म्हणे माझें निववावें डोळे ।**
**दावूनी सोहळें सामर्थ्याचे ॥२॥**

ह्या दोन अभंगांचा १ लाख वेळा जप केला. (आवर्तने केली) तर विध तापांपासून मुक्ति मिळते. शंका न घेता प्रचिती घेण्याची तयारी खवू या ना.

दुर्धर रोगांतून मुक्तता, पराकोटीचे आर्थिक संकट, कज्जेखटल्यात बणारा न्याय वा अकस्मात संसारांत उभ्या ठाकणाऱ्या संकटातून, पण आणि आपल्या कुटुंबियांच्या अंतिम कल्याणाच्या दृष्टीने, र्थाच्या दृष्टीने, योग्य ठरणारा, मार्ग निघण्यासाठी वरील २ गांचा प्रथम ८ हजार आणि नंतर १६ हजार जप करूं या.

पदरीं निराशा येणार नाही. प्रभु तुम्हाला टाकणार नाही.

**"उपासनेचा उदंड आश्रयो । उपासनेविण निराश्रयो ॥"**

★ ★ ★

## नमो नमो गणेशाय . . . .

सर्वांगीण, सात्विक यशाने जीवन उजळून निघावे असे वाटत असल्यास संकल्पपूर्वक खालील मंत्राची, शुचिर्भूत अवस्थेत, आसनस्थ होऊन, साधना करावी. पाटावर बसून कधीहि साधना करू नये. दर्भासन (नसेल तर चटई-प्लॅस्टिकची नव्हे) त्यावर जाड कांबळे वा रग आणि त्यावर पांढरा स्वच्छ-धूतवस्त्र-पंचा घालून, पूर्वेकडे तोंड करून, अर्थात उदबत्ती, तुपाचा दिवा लावू जप करावा. जपसंख्या किमान ३ लाख पुरी करावी. रोज जपाच नोंद ठेवून त्यावेळी (जपकालात वा नंतर) येणारे सर्व अनुभ लिहून ठेवावेत. सुरुवातीला जप थोडा मोठ्याने-आपल आपल्याला ऐकू येईल इतपत-करावा, म्हणजे वाचाशुद्धि, तनुशु आणि भोवतालची वातावरणशुद्धि घडत राहिल्याची जाण ये भगिनीवर्गाने 'अडचणीच्या ५ दिवसांत' हा जप करू नये. उष्ण वाढून रक्तस्राव जास्त होईल. उष्णतेचे विकार तीव्रतेने जाणवतु शारीरिक त्रास संभवतो.

### 'ॐ गं ॐ'

साधना करताना उष्णतेचा त्रास होऊ लागल्यास त्रिकाल पाण्याने स्नान करणे हितकारक. दूध (शक्यतो गाईचे)





पिंपळी वा सुंठ/आलें घालून उकळून प्यावे. (कफकारक प्रकृतीच्या साधकाना त्रास होणार नाही) थंड पदार्थांचे-आईस्क्रीम नव्हे-सेवन करावे. थंड पाणी असलेल्या टबांत वा बादलीत दोनहि पाय बुडवून २०/२५ मिनिटे दररोज बसावे.

जपसंख्या पूर्ण झाल्यावर मग प्रतिदिन १०८ वेळा जप करीत राहणे अगत्याचे आहे.

सर्वप्रथम पांढऱ्या कागदावर तांबड्या शाईने जप लिहून तो श्रीमंगलमूर्तीसमोर (देवांसमोर) ठेवावा आणि प्रत्यक्ष श्रीविघ्नहर्ताच आपल्याला मंत्राचा अनुग्रह देत आहे, हे मनोमन कल्पून ६ वेळा मोठ्याने मंत्र उच्चारावा.(३ वेळ श्रीगणेशांचे सांगणे ३ वेळ आपले म्हणणे, असे एकूण ६ वेळ मंत्र म्हणावा. अंकशास्त्रांत ३ हा गुरुग्रहाचा आकडा मानला जातो.) हे करताना उदबत्ती, तुपाचा दिवा लावून, गुळखोबऱ्याचा नैवेद्य 'श्रीं' ना अर्पण करावा.

श्रीगुरुदक्षिणा म्हणून श्रीफलासह, सुपारी, किमान १। रुपया (नाणी) ओला करून, त्यावर एक तांबडे फूल, ४ दूर्वांकुर ठेवून, अर्पण करावी. **'दक्षिणा ओली का करतात ?'** तुमचा चेहराच हा प्रश्न मला सांगून गेला. दक्षिणा, श्रद्धा, भक्ति आणि समर्पण भावांत ओलीचिंब भिजवून द्यावयाची असते. त्याच प्रतीक म्हणून पाण्यात भिजवून देणे, बर. श्रीगोंदवलेकर महाराज म्हणत असत, 'आपल्या हातून अन्नदान झाले हा कळत नकळत येणारा अभिमान धुवून जावा, म्हणून दक्षिणा भिजवून देतात; तसेच श्रीराम कृपेने अन्नदान घडले; असा योग वारंवार यावा. या भावनेने प्रसन्न होऊन येणाऱ्या उत्कट आनंदाश्रूंत दक्षिणा भिजवून देतात.'

ओघानेच आलं म्हणून सांगतो. आपल्या घरी भोजनास येणाऱ्या व्यक्तीला दक्षिणा देण्याची प्रथा आहे. आता ती लोप पावत चालली आहे, ही गोष्ट निराळी. आपण ती त्याला भोजन सुरु करण्यापूर्वीच अर्पण करतो. ती किती द्यायची असते ? त्याला संध्याकाळच्या भोजनास जितकी रक्कम लागेल, तितकी ती सामान्यत: असावी. आपण १। रुपया अगर ५। रुपये यावर ते भागवतो. खरं ना ? तुमच्या घरी सकाळी जेवणाराची, सायंकाळचीहि भोजनाची सोय पहाणे, ही कर्तव्यबुद्धि आहे. ह्यात ममत्व, जिव्हाळा आहे. भोजन दक्षिणेची योजना त्यासाठी आहे !

★ ★ ★

## श्रीराम जय राम जय जय राम

हा एक महान सिद्धमंत्र आहे. त्रिविध तापांपासून मुक्ति देण्याचे सामर्थ्य त्यांत निश्चित आहे. पणराममय होऊन ह्या मंत्रांची साधना करायला पाहिजे.

**'श्रीराम'** म्हणताना शक्तिसहित, अखिल वैभवासहित, सर्वसामर्थ्यासहित, सर्व पातकांचा नाश करणाऱ्या श्रीरामाल[...] आपण भावपूर्ण आवाहन करतो. **'जय राम'** म्हणताना **त्याच्[...]** सामर्थ्यावर पूर्ण भरवसा ठेवून भावपूर्ण अवस्थेत अधिक **विरघळ[...]** जाऊन स्तुतिस्तोत्र म्हणण्याच्या अवस्थेत जातो. **'जय जय रा[...]** म्हणताना पूर्ण समर्पण करतो. त्रिवार जय आणि **त्रिवार [...]** म्हणताना आपण नादानुसंधान साधतो. राममय **होण्या[...]**





अवस्थेप्रत जातो. मनांत प्रीति, भक्ति, अनासक्ति, मुक्तिचे तरंगावर तरंग येतात. श्रीराम हा आनंदकंद, पावन, प्रसन्न, पराक्रमी, प्रेरक, परममंगल, पतितपावन, परमकृपाळू आहे ह्याची प्रकर्षाने जाण येत येत आपण

**'रामान्नास्ति परायणं परतरं**
**रामस्य दास्योऽस्म्यहं ।**
**रामेचित्तलय: सदा भवतु मे**
**भो राम मामुद्धर ॥३७॥**

अशा अवस्थेप्रत जातो. 'मला श्रीरामाहून दुसरा कोणीहि श्रेष्ठ वाटत नाही. मी रामरायाचा दास आहे. माझे चित्त रामाच्या ठिकाणी लय पावो. हे रामा, तू माझा उद्धार कर.'

हे 'राम' नाम कसे आहे ?

**तुका म्हणे नाम । चैतन्य निजधाम ॥**

**'समुद्र वलयांकित पृथिवीचें दान ।**
**करितां, समान नये नामा ॥१॥**
**म्हणवूनि कोणी न करावा आळस ।**
**म्हणा रात्रंदिवस राम राम ॥२॥'**

१२ कोटी रामजपाने संपूर्ण कुंडलीतील १२ स्थाने शुद्ध होतात. [...]नशुद्धीचे रोकडे अनुभवहि येतात. रामनाम कधी घ्यावे ? कसे [...]ावें ?

**'जप नेमिला तो चुकों नेदावा ।**
**त्या वेगळा सर्वदा करावा ॥**
**मळत्यागींही न विसंबावा ।**
**कर्मठपणें करूनि ॥'**

हे समर्थ श्रीरामदासस्वामी कंठरवानें सांगतात, श्रीवामन पंडित म्हणतात,

**'अहो येतां जातां उठत बसतां कार्य करितां ।**
**सदा देतां घेतां वदनिं वदतां ग्रास गिळतां ॥**
**घरीं दारीं शय्येवरि रतिसुखाचे अवसरीं ।**
**समस्तांची लज्जा त्यजुनि भगवच्चिंतन करीं ॥'**

'राम' नामाचे सामर्थ्य सांगताना श्रीरामदासस्वामी आत्मविश्वासपूर्वक ठामपणे सांगतात,

**'रामनामाची ऐसी प्रौढी । कळीकाळाची नरडी मुरडी ।**
**यमाचेहि दांत पाडी । ओस पाडी यमलोक ॥'**

देहत्यागापूर्वी प्रत्यक्ष रामरायाकडून श्रीस्वामींनी सेवकांसाठी आश्वासन मिळविले.

**'जातां येतां धंदा करितां । जपसंख्या मात्र धरतां ॥१॥**
**एका तेरा कोटींतचीं । पापें जाती जन्मान्तरीचीं ॥२॥**
**गणना होता तेरा कोटी । साक्षात भेटेल जगजेठी ॥३॥**
**न लगे आसनीं बैसावे । न लगे अन्नही त्यजावें ॥४॥**
**ऐसे ऐकोनिया वचन । दास झाला सुखसंपन्न ॥५॥'**

★ ★ ★





भगवान् श्रीकृष्णांच्या द्वारकेत श्रीरणछोडदासजींच्या मंदिराजवळच एक छोटेखानी बैठी आधुनिक इमारत आहे. इमारतीच्या दर्शनी भागावर **'श्रीराम जय राम जय जय राम'** हा महामंत्र लिहिलेला आहे.

रस्त्यालगतच ही इमारत आहे. श्रीकृष्णांच्या राजधानीत श्रीरामनामाचा घोष ? काहीशा उत्सुकतेनं मी इमारतीच्या प्रांगणांत आलो. आळंदीच्या वारकरी महाविद्यालयाचा एक सेवाव्रती तेजस्वी तरुण मला सुहास्य वदनाने सामोरा आला. सारा परिसर त्याने अत्यंत आपुलकीने मला दाखविला. ४/५ माणसं रामनामाची धून तन्मयतेन म्हणत होती. एक निरामय शांति तेथे नांदत होती. एक अनामिक, मंद, सुगंध गात्रं गात्रं पुलकित करीत होता. **गेल्या ३० वर्षापेक्षा जास्त काळ त्या वास्तूंत श्रीरामनाम अखंड, मोठ्याने घेत आहेत** ! मी तळघरांत गेलो. तेथे असलेल्या लाकडी पादुकांवर मी अगदी कळत नकळत डोकं टेकल. क्षणभर माझ भान हरपल. सर्वांगामधून एक चैतन्याची लाट उसळून गेली. माझे डोळे मिटले गेले. अनामिक आनंदाने माझ्या डोळ्यांतून अश्रू पाझरू लागले. मी स्थळ काळाचे भान विसरलो. मला सावध करीत तो तरुण अस्कलीत मराठीत म्हणाला, 'दादा, ह्या प्रेमभिक्षू महाराजांच्या पादुका आहेत. १३ कोटी श्रीरामनाम त्यांनी स्वहस्ते लिहिलं. त्या ह्या सर्व पोथ्या येथे रचून ठेवल्या आहेत ! द्वारका बेटावर गेले असताना श्रीहनुमंताने त्यांना राम नाम लिहिण्याचा आदेश दिला. या, वर या. महाराजांच्या ह्या भावमुद्रा पहा.' मी वर आलो आणि ब्र. प.पू.

श्रीप्रेमभिक्षू महाराजांच्या भावमुद्रांचे फोटो पहात राहिलो. ह्या महान् कार्यात मी काय सहभाग देवू शकतो ? माझा हात खिशात गेला मात्र, पुन्हा तो तरुण म्हणाला, 'दादा, तुमच्या खिशातलं आम्हाला काहीहि नको. आम्हाला काहीहि कमी नाही. श्रीरामरायाच्या कृपेने सारा आनंद आहे. देणारच असाल तर . . .'

त्याने एक पत्रक माझ्या हातात दिलं. प्रेमान माझा हात दाबला. त्यावर लिहिलं होतं . . . .

**'जिंदगी जबतक रहेगी।**
**फुरसत न होगी कामसे ॥**
**कुछ समय ऐसा निकालो।**
**प्रेम करलो ''श्रीराम''से ॥'**

आम्ही दोघांनी एकमेकाकडे पाहिलं. दोघांचे डोळे भरून आले होते आणि हात निरोपासाठी जोडले गेले होते ! ★

## 'श्रीरामरक्षा' सिद्ध करू या !

श्रीरामरक्षा हे सिद्ध स्तोत्र आहे. ते कवच आहे. 'र' हे अग्निबीज आहे. अनिष्ट नष्ट करण्यासाठी, जाळण्यासाठी त्याचा निश्चित उपयोग होतो.

चैत्र शुद्ध प्रतिपदा ते चैत्र शुद्ध नवमी (श्रीरामनवमी) ह्या पाव[illegible] पर्वकाळांत, श्रीरामरक्षा हे–कवच–स्तोत्र ११०८ वेळा म्हणा[illegible] स्तोत्र सिद्ध होते. पुढे शक्य झाले तर १२ वर्षे पर्यंत प्रतिवर्षी ११[illegible]





वेळा म्हणावे. त्यातील श्लोक लोककल्याणार्थ (इतरांसाठी) वापरण्यास हरकत नाहीत. मात्र कसल्याहि तऱ्हेचे मानधन, मोबदला, हस्ते–परहस्ते घेता कामा नये. तसे केल्यास उपासना निष्प्रभ होईल. साधकाला यश मिळणार नाही. हे अनुष्ठान करताना श्रीफल, विडा ठेवणे. उदबत्ती, निरांजन, नैवेद्य अर्पण, आसन आदि नेहमीच्या सर्व गोष्टी कराव्यात.

खोलीचे खिडक्या–दरवाजे बंद करून, मोठ्याने, संकल्पपूर्वक नेहमींचे उपचार करून, श्रीरामरक्षा स्तोत्र १ वेळ मोठ्याने म्हणावे. सुमारे १५ मिनिटानंतर खिडक्या–दरवाजे उघडावेत. असे किमान १ वर्षभर नियमाने केल्यास वास्तूदोष नाहिसा होऊन वास्तू अनुकूल होते. स्तोत्र म्हणताना डाव्या हातांत पाण्याचा तांब्या (भरलेला) घेऊन त्यांत उजव्या हाताचा अंगठा बुडवून ठेवल्यास ते पाणी अभिमंत्रित होते. ते थोडे प्राशन करून खोलीत, खोलीबाहेर शिंपडावे. वास्तू प्रसन्न होण्यास त्याने मदतच होईल.

★ ★ ★

## 'श्रीरामरक्षा' अन्य उपासना . . . .

आजारपण, कौटुंबिक तणाव, द्रव्यचिंता ह्यातून सन्मानपूर्वक मार्ग निघावा म्हणून संकल्पपूर्वक, सर्व उपचार करून, [illegible]ीरामरक्षेतील खालील श्लोक ११ दिवसांत एकूण ११११ वेळा [illegible]णावा.

**श्रीराम राम रघुनन्दन राम राम ।**
**श्रीराम राम भरताग्रज राम राम ।**
**श्रीराम राम रणकर्कश राम राम ।**
**श्रीराम राम शरणं भव राम राम ॥२८॥**

हे रघुकुलनंदन श्रीरामा, हे भरताच्या ज्येष्ठ बंधू श्रीरामा, हे रणांगणात कठोरपणा करणाऱ्या श्रीरामा, तूं आमचा रक्षणकर्ता हो.

★

अध्यात्मसेवेत दिनप्रतिदिन प्रगति व्हावी. उपासना नीट, नेटकी, पद्धतशीर व्हावी म्हणून संकल्पपूर्वक, सर्व उपचार करून खालील श्लोक दररोज किमान ११ वेळा म्हणावा. किमान २ वर्षे ही सेवा करावी. नंतर सकाळ, संध्याकाळ १ वेळ म्हणावा.

**रामो राजमणि: सदा विजयते रामं रमेशं भजे ।**
**रामेणाभिहता निशाचरचमू रामाय तस्मै नम: ॥**
**रामान्नास्ति परायणं परतरं रामस्य दास्योऽस्म्यहं ।**
**रामे चित्तलय: सदा भवतु मे भो राम मामुद्धर ॥३७॥**

राजश्रेष्ठ 'राम' नेहमी विजय संपादन करतों. त्या रमापि (जानकीपति) रामास मी भजतो. राक्षसांची सेना ज्याने मार त्या रामाला माझें वंदन असो. मला रामाहून अन्य कोणीहि श्र वाटत नाही. मी श्रीरामाचा दास आहे. माझ्या चित्ताचा लय ने श्रीरामचरणीं (श्रीरामाचे ठिकाणी) होवो. हे रामराया तू म उद्धार कर.





श्रीरामरायाचे नि:सीम, एकनिष्ठ सेवक, अणूरेणू राममय झालेले, खाणे–पिणे–जगणे सारे सारे श्रीरामासाठीच अशा अवस्थेत तदाकार झालेले भक्तश्रेष्ठ श्रीहनुमानजी ! त्यांचं वर्णन करणारा हा श्रीरामरक्षेतील श्लोक.

**मनोजवं मारुततुल्यवेगं ।**
**जितेंद्रियं बुद्धिमतां वरिष्ठम् ।**
**वातात्मजं वानरयूथमुख्यं ।**
**श्रीरामदूतं शरणं प्रपद्ये ॥३३॥**

मनाच्या गतिप्रमाणे सर्वत्र गमन करणारा, वाऱ्याप्रमाणे प्रचंड वेगवान, आपल्या इंद्रियांवर प्रभुत्व गाजवणारा, त्यांना स्वाधीन ठेवणारा, बुद्धिमान लोकांत श्रेष्ठतम आणि वानर समुदायाचा अधिपति, वायुपुत्र, श्रीरामाचा दूत अशा श्रीहनुमंताला मी शरण आलो आहे.

सामर्थ्य, सेवाभाव, षड्‌रिपुंवर विजय, चपळता, विशुद्ध चारित्र्य, कुशाग्र बुद्धि, प्रभावी नेतृत्व, लोककल्याणाची निरपेक्षवृत्ती आदि गुणांनी संपन्न होण्यासाठी वरील श्लोक दररोज ११० वेळा, सतत ३ वर्षे, खंड न पडता, अनुष्ठान म्हणून म्हणावा. प्रतिवर्षी येणारे अनुभव लिहून ठेवावेत. साधकाला निश्चित लाभ होईल.

**मजला अनाथा प्रभु तूंच दाता ।**
**मी मूढ कीं जाण असेंच आतां ।**
**दासा मनीं आठव वीसरेना ।**
**तुजवीण रामा मज कंठवेना ॥८॥** (श्रीरामस्तुति)

साधक राममय होऊ लागला तर त्यांत आश्चर्य कसले ? ★

## साद-प्रतिसाद

तुम्ही तीर्थयात्रेला जा अगर मौजमजा करायला प्रवासाला जा. जिथे उतराल तिथे सामानसुमान लावा. हातपाय तोंड धुवून ताजेतवाने व्हा आणि लगेच एक उदबत्ती लावून, त्या वास्तूदेवतेच स्मरण करा. शक्य असल्यास थोडासा खाद्य पदार्थ अर्पण करा. 'आम्हा सर्वांचा निवास तुझ्या कृपेने, तुझ्या वास्तूत सुखमय, आनंदमय, निर्विघ्न होऊ दे.' अशी प्रार्थना करा. मग तुमच्या पुढच्या कार्यक्रमांची आखणी करा. अंमलबजावणी करा. रोज रात्री १ उदबत्ती लावून वास्तुदेवतेला सांगा 'तुझ्या कृपेने सर्व चांगलं आहे, बरं.' धर्मशाळा, घर, लॉज सोडताना सामानाची आवराआवर करून उदबत्ती, निरांजन लावा, थोडी दक्षिणा ठेवा. एखादा खाद्य पदार्थ ठेवा आणि प्रार्थना करा. 'हे वास्तुपुरुषा, तुझ्या असीम कृपेमुळे, आमचा तुझ्या वास्तूतील निवास सर्वार्थाने निर्विघ्न, संपन्न, आनंदमय झाला. अंत:करणपूर्वक धन्यवाद आमच्या मागून येथे जे कोणी निवासासाठी येतील, त्यानाहि त असाच सहाय्यभूत हो. येतो आम्ही, नमस्कार. ' नमस्कार करू वास्तूचा निरोप घ्या. ही कृतज्ञता पोहोचते, नोंदली जाते. वास कशीहि असो ती तुम्हाला सहाय्यभूत होते, असा अनेकाना अनुभ आहे. नमस्काराला प्रतिनमस्कार, प्रेमाला प्रेमाची साद मिळण नाही का ?







## नवीन स्कूटर, गाडी, ट्रक आदि वहान घेणारांसाठीं . . .

सर्वात महत्त्वाची सुरक्षा. पादचारी, वहानचालक आदि सर्वा-सर्वांची. वहानाची 'डिलेव्हरी' घेतानाच मूठभर तांदूळ वहानावरून ३ वेळा ओवाळून बाजूला जाऊन टाकावेत किंवा एक श्रीफल (नारळ) वहानावरून ३ वेळा ओवाळून दुकानाबाहेर जाऊन रस्त्यावर फोडावे. घरी येतांच, घराबाहेरच, हात-पाय धुवावेत. नंतर पूजा साहित्य घेऊन वहानाची पूजा करावी. सर्वप्रथम सर्व चाकांवर पाणी घालावे. त्यानंतर दूध घालावे व शेवटी पुन्हा पाणी घालून वहानाला, टायर्सना हळद-कुंकू लावावे. गंध-फूल वहावे. वहानावर कुंकवाने स्वस्तिक काढावे. उदबत्ती, निरांजनाने वहानाला ओवाळून त्याला दूधसाखरेचा नैवेद्य अर्पण करावा. नंतर हातांत श्रीफल घेऊन श्रीगणेशकवच, श्रीरामरक्षा, श्रीदत्तकवच, श्रीशिवकवच, श्रीहनुमान वा श्रीदेवी कवच (कोणतेहि एक) म्हणत वाहनाला ३ प्रदक्षिणा घालून श्रीफल वाहनावरून ३ वेळा ओवाळून बाजूला जाऊन फोडावे.

नंतर गाडीला नमस्कार करून गाडीत बसावे. 'मला दररोज सुखरूप नेण्या-आणण्याची जबाबदारी तुझी आहे.' हा भाव नमस्कारांत असावा. गाडीत आपल्या कुलस्वामिनीचा, कुलदेवाचा, उपास्यदेवतेचा आणि **वीर हनुमानाचा फोटो** लावावा. (स्टीकर्स चालतील). सर्वांगीण रक्षणाची जबाबदारी वीर हनुमान सांभाळील. नंतर प्रार्थना करावी. 'हे दयाघन प्रभु, तुझ्या कृपेने मिळालेले हे वाहन सर्व संकटापासून मुक्त राहो. ह्यातून प्रवास

करणाऱ्या सर्वांचे सदैव रक्षण करून, त्यांना सर्वार्थाने समर्थ कर. श्रीचरणसेवारत कर.'

सर्वप्रथम वहान सुरु करण्यापूर्वी त्याच्या प्रत्येक चाकाखाली एक केळे ठेवावे. त्यावरून वहान न्यावे.

वहानाच्या गतिशी वायुचा संबंध आहे. श्रीहनुमान वायुपुत्र आहे. वीर हनुमान गाडीचे सर्वतोपरि रक्षण करतो.

कौरव–पांडव युद्धाच्या अखेरीस श्रीकृष्णाने अर्जुनाला सांगितले, 'बा, धनंजया. आज तू सर्वप्रथम रथांतून खाली उतर. त्यानंतर मी उतरतो.' अर्जुन–श्रीकृष्ण दोघेहि एकामागोमाग रथांतून उतरले. रथावर आरूढ झालेल्या हनुमानाने गर्जना करीत, रथावरून जमीनीवर उडी मारली आणि ..... क्षणार्धात अर्जुनाचा रथ कापरासारखा जळून गेला ! रथावर सोडण्यात आलेली महाभयानक अस्त्रे, मंत्रतंत्राचे प्रयोग हनुमानाने आपल्या सामर्थ्याने रोखून ठेवले होते !

दररोज वहान चालविण्यास सुरुवात करण्यापूर्वी **कोणताहि एक कवचपाठ करून,** सर्वांना अभिवादन करून, वाहन सुरु करावे. प्रवास सुखाचा झाला नाही तर नवल !

## महत्त्वाची गोष्ट विसरलात ?
## मग म्हणा ......

**'ज्ञानेबा माऊली । तुकाराम'** असं अनन्यभावाने १०/१२ वेळा म्हणा, म्हणजे तुम्ही जे काही विसरला असाल ते तुम्हाला पटकन





आठवेल. कसं ? अहो, ज्ञानोबा आणि तुकोबाराय ही सरस्वतीची लाडकी बाळे आहेत. त्यांचं नुसतं स्मरण केल की आई प्रसन्न होणार नाही का ? ती किंचित् डोकावून पहाणारच.

आणखी सांगू कां ?

प. प. श्रीवासुदेवानंद सरस्वती (टेंब्ये) स्वामी महाराजांचा हा मंत्रात्मक श्लोक म्हणा. माता श्रीसरस्वती नक्की प्रसन्न होते.

**'नमस्ते शारदे देवी सरस्वति मतिप्रदे ।**
**वस त्वं मम जिव्हाग्रे सर्वविद्याप्रदा भव ॥'**

अनेकांनी अनुभव घेतला आहे. तुम्हीहि संकोचू नका. हं, करा सुरुवात.

★ ★ ★

एका संध्याकाळी कु. सुनिता कुलकर्णी, फणसवाडी, मुंबई-२ ही आणि तिची आई माझे घरी आल्या. दोघीहि खूप नाराज होत्या. 'हं ऽ काय हुकूम आहे, ताई ?' मी विचारले आणि ..... सुनिता चक्क रडू लागली. तिची आई म्हणाली, 'अहो, स्वामी, सुनिता नापास झाली सहामाही परीक्षेत. ४२ टक्के मार्क आहेत तिला. २/३ विषयांत तर .....' 'आल, लक्षात. चिंता नको. वार्षिक परिक्षेत आपल्याला ७०/७५ टक्के मार्क मिळाले पाहिजेत. करायची सुरुवात ?' सुनिताने डोळे पुसले. तिच्या चेहऱ्यावर मंद हसू आल.

दररोज उदबत्ती, तुपाचा दिवा लावून (आपल्या डाव्या हाताकडे, म्हणजेच देवाच्या उजव्या हाताला) कुलदेव, कुलदेवतेचे स्मरण करून, माता–पिता, गुरुजनाना मनोमन वंदन करून,

(आपल्याबरोबर आई–वडील राहत असल्यास त्यांना प्रत्यक्ष वंदन करून) दूध–साखरेचा नैवेद्य अर्पण करून साधनेस बसावे. आपल्या उजव्या हाताला आई श्रीसरस्वतीसाठी छोट आसन ठेवावे. 'आई, तू ये आणि माझी प्रार्थना ऐक. कृपा कर.' असा संकल्प करावा आणि खालील मंत्रात्मक श्लोक श्रद्धाभक्तियुक्त अंत:करणाने दररोज १०८ वेळा म्हणावा. किमान ६ महिने हे करावे. मग पुढे दररोज २१ वेळा केला तरी चालेल.

**'नमस्ते शारदे देवि सरस्वति मतिप्रदे ।**
**वस त्वं मम जिव्हाग्रे सर्वविद्याप्रदा भव ॥'**

'तुपाचा दिवा .......' सुनिता पुटपुटली. 'अग, शक्यतो चांगलं तूप वापराव, पण आपली परिस्थिती बेताबेताची असेल तर जे तूप आपल्याजवळ असेल ते वापराव. प्रभूला म्हणावं मला चांगलं साजूक तूप वापरण्याची ऐपत दे. तो नक्की रागावणार नाही.'

'नुसत्या उदबत्तीवर नाही कां चालणार ?' सुनिताने **थोड्या** धीटाईने प्रश्न केला. 'नाही. उदबत्ती बरोबर तुपाचा दिवाहि **हवाच**, **'श्रीदत्तमहात्म्य'** ग्रंथात प. प. श्रीवासुदेवानंद सरस्वती स्वामी महाराजांनी उपासना कशी करावी हे सांगताना स्पष्टपणे लिहि आहे.

**'घृतदीप लावूनि एकांत ।**
**करता साधे प्रयोग ॥'** (अ. ६/१०८)

उपासनेत तुपाच्या दिव्याला अनन्यसाधारण महत्त्व आ





तुपाचा दिवा हे तेजाच, ओजाच, चैतन्याच प्रतीक आहे. 'हं, तुझी साधना पूर्ण झाल्यावर श्रीसरस्वतीला (आसनापुढे) दूध–साखरेचा नैवेद्य अर्पण करायला विसरायच नाही. दूध–साखर हे पूर्णअन्न आहे. भोजन दिल्यासारख आहे ते. 'शुभस्य शीघ्रम्। करा सुरुवात उद्यापासून.' दोघीहि घरी गेल्या. मध्यंतरी काही महिने गेले. एका संध्याकाळी सुनिता, तिची प्रगती ६२ टक्क्यांपर्यंत आल्याचे, आनंदवृत्त घेऊन आली. आता ती १२वी ला आहे. ७० टक्क्यांचं उद्दिष्ट तिने केव्हाच पार केलं आहे ! घरातून बाहेर पडताना ती एक वेळ हा श्लोक म्हणते. कॉलेजमध्ये गेल्यावर अभ्यासापूर्वी आणि सायंकाळी अभ्यासानंतरहि एक वेळ म्हणते.

वरील श्रीसरस्वतीच्या मंत्रात्मक श्लोकाचे नित्य ८ वा १६ वेळा स्मरण करणाऱ्या साधकाने कसलेहि लिखाण करण्यापूर्वी एक वेळा हा श्लोक म्हणून लिखाणास सुरुवात करावी. शद्बांसाठी न अडता एका ओघात लिखाण पुरे होते. शद्ब बदलावे वा खोडावे लागत नाहीत. भाषण, प्रवचन वा कीर्तन करण्यापूर्वी हा श्लोक एक वेळ (किमान) म्हणावा. श्रीसरस्वतीचा वास जीभेवर असल्याची प्रचिती येईल. कल्पना, गोष्टी, आठवणी, प्रसंग सूचत जातील. वाणीला रसाळपणा येईल. प्रतिपादनाची शैली, विषयाची मांडणी आकर्षक, चित्तवेधक होईल. गेली कित्येक वर्षे मी, माझे साधक धु–भगिनी याचा अनुभव घेत आहोत. मग तुम्ही ह्या कृपेपासून चित का राहाता ?

★ ★ ★

खालील श्रीसरस्वतीचे स्तोत्रहि सिद्धस्तोत्र आहे. गेली ५० वर्षे मी ते म्हणतो आहे. तिच्या कृपेत न्हाहातो आहे.

**नमस्ते शारदेदेवी काश्मीरपुरवासिनी ।**
**त्वां अहम् प्रार्थये नित्यं विद्यादानंच देहि मे ॥१॥**

**अक्षसुत्रानकुशधरा पाशपुस्तकधारिणीम् ।**
**मुक्ताहारसमायुक्ता वाचि तिष्ट तु मे सदा ॥२॥**

**कंबुकंठीसुतांम्रोष्टी सर्वाभरणभूषिताम् ।**
**महासरस्वतीदेवी जिव्हाग्रे संनिविश्यताम् ॥३॥**

**या श्रद्धा, धारणा, मेधा वाग्देवीविधींवल्लभा ।**
**भक्तजिव्हाग्रसदना क्षमादि गुणदायिनीम् ॥४॥**

**नमामि यामिनीनाथ लेखालंकृतकुंतलाम् ।**
**भवानी भवसंताप निर्वापणसुधानिधीम् ॥५॥**

दररोज ८ वा १६ वेळा हे स्तोत्र ६ महिने (किमान) म्हणावे. दर पौर्णिमेला १६ वेळा म्हणावे.

नंतर सकाळी १ वेळ म्हणून आपल्या कामास जावे. सर्वांगीण सफलतेचा अनुभव येईल.

★ ★ ★

कुशाग्रबुद्धि, अचूक निरीक्षणशक्ति, वाणीवर प्रभुत्व, अचूक आकलनशक्ति येण्यासाठी किमान ६ महिने दररोज २१ वेळा खाली स्तोत्र म्हणावे. नंतर पुढे दररोज १ वेळा म्हटले तरी चालेल.



॥ श्रीगुरु:शरणम् ॥

**श्रीगणेशायनम: । अस्य श्रीप्रज्ञावर्धन स्तोत्र मंत्रस्य । सनत्कुमार ऋषि: । स्वामी कार्तिकियो देवता । अनुष्टुप छंद: । मम सकलविद्या सिद्धर्थे जपे विनियोग: ।**

श्रीस्कंध उवाच

**योगीश्वरो महासेन: कार्तिकियोगिनंदन: ।**
**स्कंध: कुमार: सेनानी स्वामी शंकरसंभव:॥१॥**

**गांगेयस्ताम्रचूडश्च, ब्रह्मचारी शिखिध्वज: ।**
**तारकारि उमापुत्र: क्रोंचाराति षडानन: ॥२॥**

**शद्बब्रह्मस्वरूपश्च सिद्ध: सारस्वतो गुरु ।**
**सनत्कुमारो भगवान भोगमोक्षप्रद प्रभु: ॥३॥**

**शरजन्मा गणाधीश पूर्वजो मुक्तिमार्गकृत ।**
**सर्वगणप्रणेता च वांच्छितार्थ फलप्रद: ॥४॥**

**अष्टाविंशिति नामानि मदीयानि च य: पठेत ।**
**प्रत्यूषे श्रद्धा युक्तो मूको वाचस्पतिर्भवित ॥५॥**

**महामंत्रयानीति मम नामानि कीर्तयेत् ।**
**महाप्रज्ञामवाप्नोति नात्रकार्या विचारणा ॥६॥**

*॥ इति श्रीस्कंधपुराणे कार्तिकियमाहात्मे प्रज्ञावर्धन स्तोत्रं संपूर्णम् ॥*

★ ★ ★

## दृष्ट लागते ?

ती तरुण मुलगी धीटाईने पुढे झाली आणि बसच्या रांगेत मागील बाजूस उभे असलेल्या त्या तरुणाला म्हणाली, 'माफ करा, परंतु तुमची २/३ मिनिटे मला देता का ?' 'हो, अवश्य,' म्हणून तो तरुण बसच्या रांगेतून बाहेर पडला. बस स्टॉपपासून थोड्या अंतरावर ती दोघे थांबली. तो तरुण बुचकळ्यात पडला होता. फार वेळ न लावता ती तरुणी त्याला म्हणाली, 'गेले १५/२० दिवस मी पहाते आहे, तुम्ही माझ्याकडे अगदी टक लावून पहात असता, परंतु तुमच्या डोळ्यात इतर तरुणासारखा भाव नसतो. असतं ते कारुण्य, अस का ?' एका दमात तिने सार काही सांगून टाकलं. तो तरुण थोडा गंभीर झाला. 'त्याच अस आहे.' त्याने आव[...] गिळला. बोलायला त्याला खूप प्रयास पडत होते. 'मला एक बहि[...] होती. ती तुमच्याच सारखी दिसायची. आता असती तर तुमच्या[...] सारखी सुंदर, सात्विक दिसली असती.' त्याच्या डोळ्यातून [...] ओघळले. तो तसाच बोलत राहिला.

'आता ती नाही म्हणून मला खूप खूप . . . . .'

'आलं लक्षात. मग मलाच तुमची बहीण समजा.'

त्या तरुणाचे डोळे अपार कृतज्ञतेने ओलावले.

★ ★ ★

ह्याउलट आणखीहि प्रकार सर्वपरिचित आहे. स[...] लालीलाल झालेली एखादी तरुणी चिडून समोरच्या मा[...]





ताड ताड बोलत रहाते. 'काय बघतोस रे मुड्या, तुला काय आई-भन, आहे का नाय ?' माणसाच्या डोळ्यांतील 'तेहि भाव' टिपले जातात ! नजरेतून सर्वभाव अचूक व्यक्त होतात.कोणाहि स्त्रीच्या खांद्यावर तुम्ही हात ठेवा. क्षणार्धात तिला कळत कीं हा हात पति म्हणून ठेवला आहे, प्रियकर म्हणून ठेवला आहे, बाप म्हणून वा अन्य चांगल्या–वाईट हेतूने ठेवला आहे.

कोणाच्या घरांत कोणी मृत झाले असेल तर आपण त्यांच्या सांत्वनासाठी भेटायला जातो. तेथे गेल्यावर सहसा मी काही बोलत नाही. बोललोच तर अन्य विषयांवर. निघताना मृताच्या निकटवर्तीयांच्या पाठीवरून नुसता हात फिरवला, तरी तो मायेचा स्पर्श खूप काही सांगून जातो. पांझरणाऱ्या डोळ्यांत तो वाचता येतो. स्पर्श, दृष्टि, केवळ मनांत उठणारे तीव्र विचार तरंग–संकल्प [...]लके असतात. मग गुटगुटीत लहान मुले, सुंदर वस्तू, देखणे [...]–पुरुष, कर्तृत्ववान माणसे आदिंना दृष्ट कां लागणार नाही ?

दृष्ट लागल्यावर ती व्यक्ति बेचैन होते. प्रसंगी आजारी पडते. [...]सांजा (संधिकाळांत) मीठ–मोहऱ्या घेऊन दृष्ट काढण्याची [...]पणाकडे पारंपारिक पद्धत आहे.

[...]मूल सहा महिन्याचे होईपर्यंत, न विसरता, तिन्हीसांजा दोन [...]नी त्याची दृष्ट काढून ती फुले प्रशम पाण्याच्या बादलीत [...]ीत व नंतर थोड्या वेळाने निर्माल्याच्या टोपलीत टाकावीत [...]न्य ठिकाणी (झाडाझुडुपांत) अगर वाहत्या पाण्यात [...]ीत. ज्यावेळी वरील काहीहि हाताशी नसेल त्यावेळी

चिमूटभर तांदूळ घेऊन लहान–मोठ्या कुणावरूनहि ३ वेळा ओवाळून घराबाहेर नेवून टाकावेत. मागे न बघता परतावे. घराबाहेरच हातपाय धुवावेत आणि घरांत प्रवेश करावा. (घरांत,. ब्लॉकमध्ये आंत येऊन मोरीत, बाथरुममध्ये जाऊ नये.)

वेळप्रसंगी आजारपण लांबल्यावर श्रीफल आजारी व्यक्तिवरून डाव्या बाजूने, पायापासून सुरुवात करून, उजवीकडे असे ३ वेळा उतरवून, तीन वा चार रस्त्यांच्या जागी फोडण्याची पद्धत आहे. त्यावेळीहि वर नमूद केलेले हातपाय धुण्याचे पथ्य पाळावे.

लहान मुले, सुदृढ, सशक्त, सतेज राहावीत म्हणून दररोज किमान उदबत्ती लावून, मोठ्याने खालील स्तोत्र एक वेळ म्हणा. उदबत्तीची विभूति मुलांच्या कपाळाला लावावी.

★ ★ ★

## बालाशिष:

स्वांशेनेदं ततं येन स त्वमीशात्रिनन्दन ॥
मुञ्च मुञ्च विपद्भ्योऽमुं रक्ष रक्ष हरे शिशुम् ॥१॥
प्रातर्मध्यान्दिने सायं निशि चाप्यच सर्वतः ॥
दुर्दृग्गोधूलिभूतार्तिगृहमातृग्रहादिकान् ॥२॥
छिन्धि छिन्ध्यखिलारिष्टं कमण्डल्वरिशुलधृक् ॥
त्राहि त्राहि विभो नित्यं त्वद्रक्षालंकृतं शिशुम् ॥३॥
सुप्तं स्थितं चोपविष्टं गच्छंतं क्वापि सर्वतः ॥
भो देवावश्विनावेष कुमारो वामनामयः ॥ ॥४॥





दीर्घायुरस्तु सततं सहओजोबलान्वितः ।

*॥ इति प. प. श्रीवासुदेवानन्दसरस्वती विरचितम् श्रीदत्तपुराणान्तर्गत बालाशिषः ॥*

दृष्टिबाधा, अन्य आजारांपासून मुक्त होऊन आरोग्यसंपन्न होण्यासाठी, नेहमीचे नियम पाळून, दररोज किमान एक वेळ खालील स्तोत्र म्हणावे आणि मुलांना, थोरांना उदबत्तीची विभूति लावावी.

**सांगावे, कवणा ठाया जावें । कवणातें स्मरावें । कैसे काय [illegible]रावें । कवण्यापरि मी रहावें । कवण येऊनि कुरुंदवाडी स्वामीते [illegible]ळवावें ॥धृ॥ या हारी जेवावें व्यवहारीं । बोलावे संसारी । घालुनि [illegible]गकारि । प्रतिपाळिसि जो निर्धारी । केला जो निजनिश्चय स्वामी [illegible]ठें तो अवधारी ॥ सांगावे ॥ या रानीं माझी करुणवाणी । काया [illegible] प्राणी । एकुनि घेशिल कानीं । देशिल सौख्य निधानीं । [illegible]टिं होऊनि मूच्छित असतां । पाजिल कवण पाणी ॥ सांगावे [illegible]या वेळा । सत्पुरुषांचा मेळा । पाहतसे निजडोळां । लाविसि [illegible] कपाळा । सांडी भय तूं बाळा । श्रीपाद श्रीवल्लभ म्हणती [illegible] तुज गोपाळा ॥ सांगावे ॥**

[illegible]ाविसि भस्म ...... तुज गोपाळा' हा चरण म्हणतच [illegible]तांना विभूति लावावी. त्यांना अभय खुद्द श्रीपाद [illegible]स्वामींनी दिले आहे. हे अवश्य लक्षांत घ्यावे !

★ ★ ★

## परमंत्र, परयंत्र, परतंत्र समंधादि बाधा नष्ट करून आनंदवर्धन करणारे स्तोत्र

श्रीगणेशाय नमः । ॐ श्रीपाद श्रीवल्लभ श्रीदत्तराज ।
नरहरि गुरवे नमः । ॐ श्रीसच्चिदानंदात्मने नमः ।
पालय मां दीनबंधू । गुरुदत्त जनार्दन एकनाथ कृपा करी ।
अंबे त्रिपुर सुंदरी । ॐ नमो भगवते मातोश्री ।
सकल भयोच्चाटणाय । भैरवाय भूत प्रेत पिशाच । ब्रह्मराक्षस
वेताल शाकिनी डाकिनी भानामति । छिंदय ।
ॐ व्हां व्हीं व्हुं यं यं रं रं लं लं वं वं शं शं दिग्बंधनं ।
परविदत्त परमंत्र परयंत्र परतंत्र छेदय छेदय ।
सर्वदुष्टग्रह निवारय निवारय जारण मारण
उच्चाटय उच्चाटय ।
वशीकरण शोषय शोषय मोहय मोहय ।
ज्वालय ज्वालय । सर्व समंधादि बाधा ।
निवारय निवारय ।
स्वमंत्र स्वयंत्र स्वतंत्र रक्षणाय ।
ॐ व्हीं व्हीं व्हीं हूं हूं हूं । फट् स्वाहा ।
सखाराम सोनाजी तुला माझा नमस्कार असो.
विद्या राख.

संकल्प, नेहमीचे उपचार करून, दरमहा १०० वेळा स्तोत्राचे, किमान १ वर्षभर पाठ करावेत. नंतर आसनस्थ





डाव्या हातात पाणी भरलेली छोटी लोटी घेऊन त्यात उजव्या हाताचा अंगठा बुडवून किमान ११ वेळा वरील स्तोत्र म्हणावे. ते पाणी साधकाने प्रथम प्राशन करावे. नंतर घरांतील सर्व खोल्यांत, सर्व भागांत पाणी शिंपडावे. पिण्याच्या, स्वयंपाकाच्या पाण्यात टाकावे. घराबाहेरहि शिंपडावे. पीडित व्यक्तीलाहि पिण्यास द्यावे. सतत ११ दिवस (जरुर तर अधिक काळ) हा उपाय करावा. चांगला अनुभव येईल.

★ ★ ★

## एकाकी झुंज . . . . .

दुपारी ३ चा सुमार होता. एक ६८/७० वर्षांच्या गोऱ्या, देखण्या, विवाहित, वृद्ध बाई धांपा टाकीत माझ्या घरी आल्या. त्यांना धड बोलतासुद्धा येत नव्हत. मी त्यांना बसायला खुर्ची दिली. थोड पाणी दिल. थोड्या वेळाने त्यांनी मला आपली हकिगत सांगितली.

'माझे यजमान एका बड्या उद्योगधंद्यातून सेवानिवृत्त झाले. ...गल्या पगारावर त्यांना दुसरी नोकरीहि लगेच मिळाली आहे. ...ी विवाहित मुलगी परदेशात असते. मुलगा धड शिकला नाही, ... त्याला एक साधारणशी नोकरी लागली आहे. त्याचं लग्नहि झालं ... . सून हुशार आहे. १२०० स्के. फूटांचा ६ खोल्यांचा, कॅंडेल ...र, समुद्र किनारी असलेला ब्लॉक माझ्या नावावर आहे. मी ... मृत्यूपत्र केले असून सदरहू ब्लॉक फक्त मुलालाच देवू केला ... . मुलगा तेथे राहू शकतो, पण त्याने तो विकता कामा नये, अशी

अट मी नमूद करून ठेवली आहे. विकला तर ५०% रक्कम मुलीला वा तिच्या वारसाना द्यावीच लागेल, हेहि लिहून ठेवले आहे.'

'अहो ताई, हा सारा तपशील तुम्ही मला का सांगता आहात ?'

'मला तुमची मदत पाहिजे म्हणून !'

'मदत ? मी काय मदत करू शकतो ?'

'ऐका तर. हल्ली माझे यजमान 'ब्लॉक विकून गांवी जाऊ या,' असं सारखं मला सांगतात. त्यांना बाईचा नाद आहे. त्यांची एक सिंधी मैत्रिण आहे. तिला त्यांनी एक ब्लॉक घेऊन दिला आहे. तिला २ मुलीहि झाल्या आहेत.' त्या बाईंना एकदम हुंदकाच फुटला.

'बरं, बरं. शांत व्हा. पण हे तुम्हाला केव्हा कळलं ?'

'सुमारे २ वर्षांपूर्वी त्या बाईचं इनलँड पत्र घरच्या पत्त्यावर आ तेव्हा. ते नीट चिकटलेलं नव्हतं 'मोठी मुलगी खूप आजारी आ लगेच भेटा.' असा पत्रात मजकूर होता. शेजारचा बदलेला नंबरहि त्यांत नमूद केलेला होता.'

'ती बाई त्यांची परिचित असेल......'

'स्वामी, त्याबाबत अधिक न बोललेल बरं. त्या नंबरावर करून माझ्या भावाने पत्ता मिळवला. समक्ष बाईची भेट घेऊन खात्री करून घेतली. यजमानाना जाब विचारला तर 'तुला काही पडतंय कां ? माझं मी पाहून घेईन,' असं उत्तर मिळालं... विकायची आहे. तुझी सही दे.' अशी भुणभुण हल्ली रोज सुरू गिऱ्हाईकं घरी आणतात. त्यांना जागा दाखवतात. माझं घराबाहेर फेकतात. अंगावर धांवून येतात.'





'म्हातारपणी हे काय आरंभलय् त्यांनी ?'

'त्या बाईची पुढची सोय' करून ठेवण्यासाठी त्यांना पैसा हवा आहे. मी रीतसर पोलीस खात्यात तक्रार नोंदविली. वेळोवेळी नोंदवतेच आहे. हल्ली घरखर्चाला, औषधपाण्याला ते मला पैसे देत नाहीत. आता माझ्यावर जारण–मारणाचे प्रयोग सुरु केले आहेत. माझ्या उशाखाली, अंथरुणांत नवनवीन गोष्टी मिळतात. जेवताना माझं लक्ष नसलं तर पदार्थात काही अंगारे टाकतात. माझी सून जवळ असली तर हे मला सांगते. मला आता कमी दिसतं. एका डोळ्यांत मोतीबिंदूहि वाढला आहे. हे प्रयोग निष्फळ झाले पाहिजेत. काय वाटेल ते झालं तरी मी ब्लॉक विकणार नाही. गावी तर मुळीच जाणार नाही. सांगाल ती उपासना करीन.'

**'सखाराम सोनाजीचं'** स्तोत्र मी त्यांना लिहून दिल. 'हे स्तोत्र रोज ११ वेळा म्हणून त्याचं अभिमंत्रित पाणी सर्वत्र शिंपडण्यास सांगितलं. पिण्याच्या पाण्यांत; स्वयंपाकाच्या पाण्यांत घालण्यास सांगितले. स्तोत्र पठण सतत करीत रहा. एक दिवसहि खंड पडू देवू नका. म्हणून समजावलं.'

यजमानांचे नवनवे प्रयोग कसे निष्फळ होत आहेत. ते त्या मला ...र सांगत. पुढे त्यांचे डोळ्याचे ऑपरेशन झाले. ...टलमध्येहि त्या सांगितलेलं स्तोत्र म्हणतच होत्या. सुमारे ... वर्ष झाली. त्यांनी एकाकी झुंज दिली. अखेरपर्यंत ब्लॉक विकू ... नाही. उपासना सोडली नाही. गेल्याच महिन्यात त्या आपटे ... देवाज्ञा झाली !

★

## वाममार्गी उपासनेचा प्रतिकार

वाममार्गी उपासनेने आजुबाजुचे लोक आणि नातेवाईक मंडळीना संत्रस्त करणाऱ्या एका कजाग सासूला विरोध केला म्हणून 'तुला आता जीवंतच ठेवत नाही,' असं सांगून एकुलत्या एक सुनेवर प्रयोग करणाऱ्या जगावेगळ्या सासूची ही कहाणी. कल्याण परिसरातली. सून अलका साने मुंबईला सेल्सटॅक्स खात्यात नोकरीला. राहाते ठाण्याला. जेव्हा जेव्हा सासू ठाण्याला घरी येते, तेव्हा तेव्हा नवराबायकोत भांडणं होतात. वस्तू गायब होतात. कपडे जळतात. अन्न खराब होतं. सूनेने **'सखाराम सोनाजी'** स्तोत्राची नेटा उपासना केली. संसार वांचविला. जीव वांचविला. सासूचे स प्रयोग निष्फळ ठरले. कल्याणला वृद्धावस्थेत सासू काळ कंठते आ मुलगा तिचे सारं काही करतो. लांबून, भेटत नाही ! लग्न झालेल मुली तर आईच्या वाऱ्यालाहि उभ्या राहत नाहीत !

## ताप उतरत नाही ?

अशक्तपणा आला असेल, चढलेला ताप उतरत नसेल श्रीनवनाथांना मनोमन वंदन करून, उदबत्ती लावून खालील सि पेशंटच्या (रोग्याच्या) डोक्यापासून पायापर्यंत हात फिरवीत (मंत्र) म्हणावा. प्रत्येक वेळी मंत्र म्हणून झाला कीं पाया आपला हात जोराने बाहेरच्या बाजूस झटकावा.

**ॐ नमो आदेश । गुरुजीको आदेश । शुग्रीवाय ।**
**सूर्यपूत्राय । नवग्रहाय । एकाह्निक ज्वर ।**





**द्व्यह्निक ज्वर । चार्हिक ज्वर । कामज्वर । भूतज्वर ।**
**प्रेतज्वर । वेळज्वर । रात्री ज्वर । वदे वदे स्वाहः ।**
**ज्वर न उतरे तो साई गोरखनाथ की द्वाही ।**
**गुरुकी शक्ति मेरी भक्ती । चले मंत्र ईश्वरी वाचा ।**
**पिण्ड कच्चा । गुरु गोरखनाथ का शब्द सच्चा ।**

सर्वप्रथम, नेहमीचे सर्व उपचार करून, साधकाने दररोज २७ वेळा, किमान २७ दिवस हा वरील मंत्र जपावा. मगच वरील उपाय योजना करावी.

तत्पूर्वी आपली श्रीकुलस्वामिनी, श्रीकुलदेव, मातापिता, आचार्य, गृहलक्ष्मी, श्रीनवनाथांना, सकल गुरुपरंपरेला अति विनम्रभावाने, ताप निवारणार्थ, सहाय्यभूत होण्याची प्रार्थना अवश्य करावी.

★ ★ ★

शनिवारी सुरुवात करून ८ दिवसांत खालील मंत्राचा ११०० ळा जप करावा. संकल्प व नेहमीचे उपचार करावेत. प्रार्थना रावी.

**' समुद्रस्य दक्षिणतीरे द्विविदो । नामस्य वानरः ।**
**तस्य स्मरणमात्रेण ज्वरो गच्छति रसातलम् ॥ '**

प्रत्यक्ष उपचार करताना आजारी व्यक्तिला आराम पडावा म्हणून नी प्रार्थना करावी. हातात भस्म घेऊन वरील मंत्राचा ११ वेळा करून, ती विभूति तापग्रस्त व्यक्तीला लावावी. असे ३ दिवस

करावें. तापग्रस्ताला आराम वाटू लागेल.

हे वरील दोनहि उपचार करताना त्याजागीं (घरांत) साधकाने काहीहि खाऊ–पिऊ नये. कसल्याहि तऱ्हेचा मोबदला–मानधन किंवा वस्तू स्वीकारू नयेत. हे पथ्य कटाक्षाने पाळावे. ★

## दर्शनमात्रे मन कामना पुरती

'हे हेरंबा, मंगलमूर्ते, आज तुझी कसोटी आहे. तुझ्या
परमभक्ताची श्रीरामदासस्वामींचीहि कसोटी आहे. तूं खोटा की
श्रीरामदासस्वामी खोटे किंवा तुम्ही दोघेहि खोटे हे आ
ठरणार आहे. आता अंत पाहू नकोस. तुझ्या बालकाला पोटा
घे'. एक जुने थोर साधक श्री. विठ्ठलराव बांदेकर (आताचे प
श्रीआबाजी बांदेकर) भाद्रपद, गणेश चतुर्थीला पूजेला आ
ठेवलेल्या मातीच्या गणेशमूर्तीपुढे उभे राहून कळवळून प्रा
करीत होते. त्यांच्या डोळ्यांतून झरझर अश्रू ओघळत होते.
राहणार वाडोसचे. माणगाव (सावंतवाडी) पासून सुमारे ४ मैल
असलेले खेडेगांव ते. तेथे त्याकाळी ना डॉक्टर ना वैद्य. रा
वेळ. कुडाळ–सावंतवाडीला जावं तर जवळ वहान नाही. प्रति
आबांच्या ३/४ महिन्यांच्या नातीची (सौ. भारती शिरसा
मुलीची) प्रकृती गंभीर होत होती. ताप वाढत होता. ना
मंडळीत ३/४ जणी नर्स. त्यांनी आपापल्या परीने उपचा
पण . . . . . ताप कमी होईना. श्रीगणेश चतुर्थीसाठी घरी
नातेवाईक माणसे चिंतातूर झालेली. कोणालाच काही सुचे



|| श्रीगुरु:शरणम् ||

विठ्ठलराव श्रीगणेशाला पुढे सांगू लागले. 'अरे, तुझ्या आरतीत काय लिहिलय रामदासांनी ? 'दर्शनमात्रे मन कामना पूरती' होय ना ? मग मी तुझ आता मनोभावे दर्शन घेतल. माझ्या नातीचा ताप पहाटेपर्यंत उतरून, ती बरी होऊन खेळू लागल्यावर, मग तुझे उद्या प्रतिवर्षाप्रमाणे पूजन–अर्चन होईल. ह्या मुलीची आई त्यानंतर तुझी सेवा करेल. आधी मला प्रचिती दे. केवळ 'दर्शनमात्रे मन कामना पूरती' झाली नाही तर तुम्ही दोघे खोटे ठराल. तुझ्या बरोबर श्रीरामदासांसारख्या तुझ्या नि:सीम भक्ताला कमीपणा येईल. हे तुझ्या लक्षात आहे ना ?' श्री. विठ्ठलराव विमनस्क अवस्थेत ओटीवर आरामखुर्चीत येऊन विसावले. बराच वेळ ते प्रभुचिंतनात मग्न होते. पहाटे ते माजघरात डोकावले तेव्हा त्यांची नात खेळू– बागडू लागली होती. तिचा ताप पूर्णपणे उतरला होता. चटकन् स्नान करून ते देवघरात आले. श्रीविघ्नराज आपल्याकडे बघून हंसत आहेत असं त्यांना वाटलं. त्यांनी उदबत्ती, निरांजन लावून गूळ–खोबरं 'श्री'पुढे ठेवलं. नैवेद्य अर्पण करताना त्याचा कंठ दाटून आला. सौ. भारतीला ११२१ र्वा स्वत: काढून आणण्यास त्यांनी सांगितल्या. मूर्तीची णप्रतिष्ठा झाल्यावर भक्तिभावाने त्यांनी त्या हेरंबराजाला हिल्या. 'दर्शनमात्रे मन कामना पुरती' होते. नक्की होते ! हा नुभव तुम्ही–आम्ही सारेच घेऊं शकतो. आज घेऊ शकतो, ा, भक्तियुक्तअंत:करणाने !!

★ ★ ★

## खरेदी, करार, पैसे देणें–घेणें कधीं करावें ?

सदाफलित, विशाल औदुंबराच्या छायेत बाकावर प. पू. श्रीबाबा कीर्तिकरांची तपःपूनित, गौरकाय, देखणी मूर्ति विसावली होती. हातात चांदीची तपकिरीची डबी होती. डबीवर बोट आपटीत त्यांनी चिमूटभर तपकीर बाहेर काढली. दातांवर चोळली. ते विहीरीकडे (तिला ते 'गंगा' म्हणत) जाण्यासाठी उठले. 'थांबा, बाबा. मी आणतो गंगेचे पाणी चुळभरायला.' पटकन् उठत मी म्हणालो. विहीरीवरून एक पाण्याची बादली आणि तांब्या मी घेऊन आलो. श्रीबाबांनी ५/७ चूळा भरल्या. तोंड पुसल आणि मोठ्या खुषीत येत मला म्हणाले. 'ताटके, कसा चाललाय धंदा ?' 'बाबा, तुमची कृपा आहे. पोटापाण्याचं भागतय तूर्त तरी.' मी म्हणालो. 'व्वा, प्रभुची कृपा आहे. तो देतो, तो प्रसाद समजून स्वीकारावं. संतोष असावा मोठ्या उलाढालीच अग्रिमेंट, महत्त्वाचे करार, सूर्यउदयानंतर दुपा १२/१२॥ वाजेपर्यंतच करावेत; नंतर त्यावर सह्या करू नये चर्चा, विचार–विनिमय दुपारी ३/३॥ पर्यंत करावा; पण निर्णय मा उद्या सकाळी पाहू म्हणून पुढे ढकलावा. जुने, जाणते लोक हेच क आले म्हणून यशस्वी झाले, बरं.' 'बाबा .... मी सुरुवात कर तोच श्रीबाबा म्हणाले, 'आलं लक्षांत. सूर्यउदयानंतर तो पळा प्रकाशमान, प्रखर होत जातो. सर्व सृष्टि चैतन्यांत न्हाहू न वातावरण अनुकूल असत. दुपारी १२/१२॥ ही त्याची अवस्था. रवि ग्रह तोपर्यंत कर्मस्थानांत असतो.





तो कलला की वातावरण बदलू लागत. मग कलत्या अवस्थेत लेखी करार नाही. चर्चा, विचारविनिमय झाला तरी निर्णय नाही. काय ?' श्रीबाबा हंसत म्हणाले.

'निर्णय. सूर्यउदयानंतर मंगलमय, चैतन्यमय वातावरणांत.' मी म्हणालो.

'अगदी बरोबर. माणक, एऽ माणक, ताटके आलेत.'

माणकताई चहाचे कप घेऊन बाहेर अंगणात येत म्हणाली, 'बाबा, मी चहा आणलाय तुम्हा दोघांसाठी.'

'व्वा, छान. ताटके, चला चहा घ्या, अगोदर.'

श्रीबाबांचा हा सल्ला मी नेहमीच मानत आलो. खाजगी जीवनातील महत्त्वाचे निर्णय, करार, व्यवसायाच्या महत्त्वाच्या मिटिंग्ज्, पैशांची देवाण–घेवाण, मंगल वस्तूंची खरेदी, लग्नाच्या बैठका सकाळी करून पहा. सार काही सुखद्, मंगलमय, आनंदमय, सात्विक होतच होत.

**'हें तो प्रचितीचें बोलणें । विरळा भाग्यवंत जाणें ॥'**

★ ★ ★

## असाध्य तें साध्य करिता सायास. . .

अमृत जमीनीवर गडबडा लोळत होता. पोटदुखीनं त्याला हैराण ं होतं. घरांतील सारेजण बेचैन झाले होते. २/३ महिन्यांनी हे च घडत राही. डॉक्टरांच औषधहि तात्पुरता गुण देई. 'काय, यचं काय ?' ह्या विचाराने सुन्न झालेली अनघा त्याच्या

कपाळावरचा घाम पुसत होती. थोड्या वेळाने वसंता डॉक्टरना घेऊन आला. त्यांनी लागोपाठ २ इंजेक्शन्स दिली. गोळ्या लिहून दिल्या. उत्तररात्री थोडा आराम पडला. अमृतला झोप लागली.

दुसरे दिवशी मी अनघाला म्हणालो, 'अनघा, ही पोटदुखी थांबली पाहिजे कायमची, आपण जगावेगळा उपाय करू या.'

'म्हणजे नेमकं काय करायचं ?' अनघाने अधीरतेने प्रश्न केला.

'उद्या तू उडदाचे वडे आणि तांबड्या भोपळ्याचे गोड घारगे कर, बरेचसे. बाकीचे उद्या सांगतो.' मी म्हणालो आणि तडक माझ्या घरी निघालो.

दुसऱ्या दिवशी सकाळी मी अमृत कुलकर्णीकडे, बोरीवलीला पोहोचलो, तेव्हा त्याच्या बायकोने—सौ. अनघाने—उडदाचे वडे व तांबड्या भोपळ्याचे घारगे तयार करून ताटलीत मांडून ठेवले होते.

मी प. प. श्रीनृसिंहसरस्वती स्वामीमहाराजांची तसबी चौरंगावर मांडली. तिच्या समोर **श्रीगुरुचरित्राची पोथी आणि** वरील वडे–घारग्यांची ताटली ठेवली. तसबीरीची पूजा केली उदबत्ती, तुपाचे निरांजन ओवाळले. वडे–घारग्यांचा नैवेद्य त्यां अर्पण केला आणि अत्यंत कळवळून, भावपूर्ण प्रार्थना सुरु केली

'हे परमकृपाळू स्वामीराया, श्रीसरस्वती गंगाधर ह्या आपल लाडक्या भक्तानें ७०० वर्षांपूर्वी लिहिलेलं आपलं **श्रीगुरु** आजहि भक्तिभावाने, श्रध्दापूर्वक, असंख्य, अगणित भक्त वा आहेत. त्याचा अनुभव घेत आहेत. धन्य होत आहेत. **१** **अध्यायात** उदरव्यथेच्या ब्राह्मणाची पोटदुखी आपणच उड





वडे आदि पदार्थांने समूळ नाहिशी केलीत. ते आपलं लेकरू, आपणच संकटमुक्त केलत. मी आणि हा अमृत आपलच लेकरू आहोत. आम्हाला पोटाशी घ्या. आमच्यावर परमकृपा करा. ह्या लेकराचीहि पोटदुखी तुम्ही दिलेल्या जगावेगळ्या औषधाने समूळ नाहिशी झाली पाहिजे. आम्हाला टाकू नका. श्रीगुरुचरित्र आजहि भक्तांची लाज राखतं, हे सर्व जगाला कळू द्या. स्वामीराजा, कृपा करा.' माझे डोळे पाणावले होते.

प्रसाद म्हणून अमृतने उडदाचे वडे आणि घारगे पोटभर खाल्ले. पुढे वर्षभर त्याला उडीद व तांबडा भोपळा खावू नको म्हणून मी सांगितलं. ते त्यानं कसोशीन पाळलं. आज तो सर्वांना कृतज्ञतापूर्वक सांगतो, की माझी पोटदुखी स्वामींच्या प्रसादाने बरी झाली !

श्रीगुरुकृपाप्रसादाने काय होणार नाही ? **श्रीगुरुचरित्राच्या १३ व्या** अध्यायात श्रीगुरु सांगतात . . .

**'श्रीगुरु म्हणती सायंदेवासी ।**
**आम्ही औषधी देतो त्यासी ॥**
**अपूपान्न माषेशी ।**
**क्षीरमिश्रित परमान्न ॥३९॥**
**अन्न जेवितां त्वरितेसी ।**
**व्याधि जाईल परियेसी ।**
**संशय न धरीं तूं मानसीं ।**
**त्वरित न्यावें गृहासी ॥४०॥**

**जठर व्यथेच्या ब्राह्मणें ।**
**भोजन केलें परिपूर्ण ।**
**व्याधि गेली तत्क्षण ।**
**श्रीगुरुचे कृपादृष्टीनें ॥६२॥**
**परिस लागता लोहासी ।**
**सुवर्ण होय परियेसि ।**
**दर्शन होतां श्रीगुरुसी ।**
**व्याधि कैचीं सांग मजा॥६३॥ '**

हा अनुभव १९९० सालातील आहे. कळवळून हाक मारली तर भगवंताला जेवत्या ताटावरून उठून ओ द्यावी लागते.

**'भाव बळे आकळे । एरव्ही नाकळे ॥'** हेच खरं नाही का ?

★ ★ ★

## 'श्रीगुरुचरित्र' – घेवड्याच्या शेंगांचा अध्याय

'धंदा म्हटला की अडचणी ह्या यायच्याच. काळजी करू नका. प्रभू सर्व काही ठीक करील.' मी वसंतराव पाध्येना म्हणालो.

'माधवराव, पेमेंट सर्व ठिकाणी 'ब्लॉक' झाले आहे. देणेकऱ्यांचे पैसे वेळेवर द्यावेच लागतात. जीव मेटाकुटीला आला आहे. ताणलं तर जुनी सज्जन माणसं तुटतील. पण उसनवारी तरी किती करायची ?' वसंतराव काळजीच्या सुरांत म्हणाले.

'एक छोटी गोष्ट करा, वसंतराव.'

'काय ?'





'**श्रीगुरुचरित्राचा १८वा अध्याय** संकल्पपूर्वक दररोज १ वेळ, असा किमान ६ महिने वाचा.'

'कसा ?'

'नेहमीसारखाच. उदबत्ती, निरांजन, नैवद्य, आसन वगैरे करून.'

'संकल्प सांगा.'

'हे कृपासागर, दयाघन दत्तप्रभो. माझ्या व्यवसायात माझे ग्राहकांकडून येणारे पैसे तूर्त माझे हाती येत नाहीत. मी कर्जबाजारी झालो आहे. सर्व व्यवहार त्यामुळे ठप्प होण्याची बिकट परिस्थिती निर्माण झाली आहे. मी खूप संकटांत आहे. दीन ब्राह्मणावर असीम कृपा करून तुम्हीच त्याला 'यशः श्री सदानंद कल्याणयुक्त' धन मिळवून दिलेत. मीहि तुमचे बालक आहे ना ? मजवर कृपा करा. आपली निरंतर सेवा करवून घ्या. प्रभू लाज राखा.'

'माधवराव, व्वा. संकल्प वाचून डोळे भरून आले.'

'वसंतराव, भाव तेथे देव. त्याला यावच लागतं भक्ताच्या काजासाठी. जनी काय म्हणायची ?'

**'धरीला पंढरीचा चोर । प्रेमें बांधूनिया दोर ॥**
**हृदय बंदिखाना केला । त्यात विठ्ठल कोंडला ॥'**

'माधवराव, लगेच सुरुवात करतो.'

'छान. मध्ये काम झालं तरी उपासना ६ महिने पूर्ण करायची, हं.'

'अवश्य.'

सुमारे २/२॥ महिन्यांनी पेढे घेऊन वसंतराव पाध्ये माझे घरी

आले. मोठ्या खुषीत ते गाणे गुणगुणत होते.

**'दीन ब्राह्मणा दिधला गुरुनें कुंभ सुवर्णाचा ।**
**उपटूनी वेल घेवड्याचा ॥**
**वेल मूळ तो काढी खणूनी ।**
**कुंभ पूर्ण त्या मिळे सुवर्णी ॥**
**दैन्य तयाचे नष्ट जाहले ।**
**प्रसाद हा गुरूचा ॥'**

माझ्या हातावर ठेवलेले पेढे पुन्हा पुन्हा म्हणत होते ''प्रसाद हा गुरूचा.''

★ ★ ★

## 'मंगलमूर्ते विघ्नहरा । दूरितनाशना कृपा करा ॥'

'हा मंत्र सर्व विश्वस्तांनी श्रद्धाभक्तियुक्त अंत:करणाने म्हणत आपले उत्सवाचे कामकाज करीत रहावे. ७ दिवसांचा हा महायज्ञ 'श्री' संपन्न करून घेतील.' असें आश्वासक वक्तव्य करून प.प. यति श्रीनारायणानंद सरस्वती स्वामीमहाराज (उगार खुर्द) दंड घेऊन झपाझप माध्याह्न स्नानासाठी निघूनहि गेले.

माणगाव श्रीदत्तमंदिराचे प्रमुख विश्वस्त श्री. विठ्ठलराव बांदेकर आता निश्चिंत झाले. ऋग्वेद स्वाहाकाराचा ७ दिवसांचा एकूण खर्च मुळी ५५ ते ६० हजार होणार होता. सर्व विश्वस्तांनी निर्णय घेतला होता. देवस्थानाचा पैसा खर्च झाला तरी चालेल, पण हाती घेतलेले कार्य संपन्न झाले पाहिजे. जरूर तर देवस्थानच्या फि





डिपॉझिटस्‌च्या रक्कमाहि, व्याजाच नुकसान सोसून, मोकळ्या करण्याच ठरल होत. भक्तमंडळी वाढली तर काय करायच ? प्रतिवर्षाप्रमाणे श्रीगुरुप्रतिप्रदेचा हा उत्सव ३ दिवसांचा नसून ७ दिवसांचा आहे. समाराधनेला प्रतिवर्षी २४/२५ पोती तांदूळ लागतो, एका वेळेला, एका दिवसासाठी आणि हा उत्सव तर . . . . ''कसला विचार करताय पाडगांवकर, सबनीस ? अहो, हा उत्सव थोरल्या महाराजांच्या दरबारातील आहे. ते सारी व्यवस्था करतील. तुम्ही फक्त म्हणत रहा.

**'मंगलमूर्ते विघ्नहरा । दूरितनाशना कृपा करा ॥'**

श्री. विठ्ठलराव बांदेकर मोठ्या आत्मविश्वासाने म्हणाले. प्रतिदिन उत्सवासाठी दूरून–दूरून माणस येत होती. कार्यक्रमांत सहभागी होत होती. अन्नदान सुरुच होतं. सारं वातावरण प्रभुप्रेमान भारल गेल होत. सर्वत्र चैतन्याचा सुखद, प्रेरक प्रत्यय येत होता. उत्सव संपन्न झाला. भक्तमंडळी मार्गस्थ झाली. उत्सवाचे हिशोब झाले. फिक्स्ड डिपॉझिटस्‌च्या देवस्थानच्या रक्कमा अबाधित होत्या. खर्च–वेच वजा जाता उत्सव मंडळाकडे रुपये १० हजाराहून अधिक रक्कम उरली होती !

श्री. विठ्ठलराव बांदेकरांचे डोळे भरून आले होते. त्यांनी व्हरांड्यात येऊन श्रीदत्तमंदिराकडे तोंड केल. थोरल्या महाराजांना नमस्कार केला. त्यांच्या तोंडून शब्द फुटत नव्हते. कानाशी आवाज मात्र घुमत होता.

**'मंगलमूर्ते विघ्नहरा । दूरितनाशना कृपा करा ॥'** ★

## मंगलमूर्ते करी करुणा . . .

सखाराम खाली मान घालून घरांत आला. काहीहि न बोलता समोरच्या बैठकीवर बसला. हातातल काम थांबवून मी म्हटल, 'अरे, इतक्या सकाळी का आलास ? काय झाल ?' त्याने मान वर केली, तेव्हा त्याच्या डोळ्यांत पाणी तरारलं. 'आई बरी आहे ना ? बाबा, कामावर जातात ना ? तुझ्या नोकरीच काही ......' मी प्रश्न विचारीत सुटलो. तो मख्खासारखा बसून राहिला. 'अरे, बोल ना. किती वाजता निघालास, अंबरनाथहून ?'

'सकाळी ६ वाजता.' तो पुटपुटला.

मी उठलो. स्वयंपाक घराकडे वळलो. सौ. शुभदाने मला गप्प रहाण्याचे खुणेने सुचविले आणि चहा–बिस्कीटे सखारामपुढे ठेवली. 'हं ऽ कर सुरुवात, सखाराम.' असं फर्मावून ती आंत वळली.

थोड्या वेळाने तो बोलू लागला. 'सुमनने स्वत:च लग्न, स्वत:च जमवायची खटपट सुरु केली आहे. . . . . . . . आई आणि मी रात्रभर झोपलो नाही. मुलगा इतर जातीतला आहे. शिकलेला नाही. काही उद्योगधंदाहि करत नाही. ....'

'२/४ थपडा मारल्या नाहीस ना तिला ?'

'नाही. आई खूपच अस्वस्थ आहे. लग्न झाल तर जीव दे म्हणाली. रडते आहे, रात्रभर. माझ तर डोकच काम करत नाही. दिवसांनी मला कोकणात जायचय आंब्याच्या पेट्या आणायला काय करू ?' सखाराम काळजीच्या सूरांत म्हणाला. 'अवश्य ज





सर्वांनी संकल्पपूर्वक, सांगतो तो जप लगेच सुरु करा. १५/२० दिवसांत प्रश्नाला वाचा फुटेल. हांक मारली की प्रभु ओ देतो, सखाराम.' मी म्हणालो.

'म्हणून तर आईन सकाळी सकाळीच पिटाळल मला इकडे.' उत्तेजित स्वरांत सखाराम म्हणाला.

**संकल्प असा.** 'हे दयाघन, गुणेशा, प्राप्त परिस्थितीत सुमनचे लग्न मंगेशबरोबर होणे, उभय कुलांच्या दृष्टीने हितावह नाही. त्यांत संघर्ष आणि विनाश आम्हाला जाणवतो. त्या दोघांचे जीवन सर्वार्थाने सुखी व्हावे, असे आम्हास वाटते म्हणून ह्या विवाहविषयक प्रश्नाबाबत, आम्हा सर्वांच्या अंतिम कल्याणाचे दृष्टीने, तुला जे इष्ट वाटते ते तू घडव. लवकर घडव. आम्ही त्यासाठीं यथाशक्ति, यथामति तुझी सेवा करत आहोत. ती तू मान्य करून घे.'

'जप किती करायचा ?' सखाराम विचारू लागला. 'प्रथम **'मंगलमूर्ते विघ्नहरा। दुरितनाशना कृपा करा'** हा जप तर सुरु करा. जितका होईल तितका सर्वांनी करा. लगेच ५ हजार पुरा करा. नंतर ५ लाख करायची तयारी ठेवा. बरेच चांगले अनुभव येतील तुम्हाला.' मी खुलासा केला. जप कसा करावा त्याचा तपशीलहि सांगितला आणि सखारामला मार्गस्थ केला.

सुमारे १२/१३ दिवसांनी सकाळी सखाराम हंसतमुखाने माझे घरी आला आणि सुमन–मंगेश उभयतांनी परस्पराशी विवाह करायचा नाही, असा निर्णय घेतल्याचे त्याने मला सांगितले. कुणीहि त्याचेवर दडपण आणले नव्हते, मात्र शांतपणाने सर्व परिस्थिती

त्यांच्या समोर ठेवण्यांत आली होती. 'तुम्ही द्याल त्या घरी, मी सुखाने संसार करीन,' असे आश्वासनहि सुमनने आईला दिले..

आम्हा सर्वांना आनंद झाला. सखाराम जप सुरुच ठेवायचा बरं. फक्त आता संकल्प करायचा तो 'सुमनसाठी, लवकरात लवकर, सर्वार्थाने सुयोग्य, प्रभु तुला आवडेल असा, वर मिळवून दे म्हणून !' मी हंसत हंसत म्हणालो.

मान डोलावीत सखाराम म्हणाला 'अहो, वहिनी चहाच काय झाल ?' ★

## समर्थांचिया सेवका वक्र पाहे....

'देशपांडेसाहेब ब्लॉक तुमच्या नावावर आहे खरा, पण त्याचे पूर्ण पैसे ...'

'तुम्हीच भरले आहेत, हे मला माहित आहे. तस ते बहुतेक सर्व सोसायटी मेंबर्सनाहि माहित आहे.'

'तरीसुद्धा मी ब्लॉक नावावर ट्रान्स्फर करण्यासाठी रु. १५ हजार भरावयाचे ? हे योग्य आहे का ?'

'हे अगदी गैर आहे. सोसायटीच्या तुमच्याच मित्रांचा तो आग्रह आहे.'

'आग्रह नव्हे, अट्टाहास आहे. सेक्रेटरीने मला तसं स्पष्ट लेखी पत्र दिले आहे.'

'फार छान. कायद्यानं त्यांचे दांत पाडता येतील.'

'अहो, म्हणजे आपणच आपल्या कानफटांत मारून घ्याय





असंच ना ? ते मूर्ख असले तरी माझे मित्रच आहेत.'

'कावळेसाहेब, तुम्हाला कोंबडी खायची आहे आणि दररोज तिची अंडीहि हवी आहेत. हे जमायचं कसं ?'

'तोच तर प्रश्न आहे. आपली बाजू न्याय्य आहे, प्रभु त्यांतून नक्की रस्ता काढेल.'

२/३ दिवसांनी कावळेसाहेब मला माझ्या घरी भेटले. ही मंडळी माझ्या परिचयाची . आज भांडले तरी उद्या त्यांना एकत्र राहायचं आहे. धोरण जोडण्याचंच असायला हवं. मी सर्वांसाठी श्रीस्वामी समर्थांना प्रार्थना केली. तुकोबारायांना शरण जाण्याची सूचना मिळाली.

**पडता जडभारी । दासीं आठवावा हरी ॥१॥**
**मग तो होऊ नेदी सीण । आड घाली सुदर्शन ॥२॥**
**नामाच्या चिंतनें । बारा वाटा पळती विघ्नें ॥३॥**
**तुका म्हणे प्राण । करा देवासी अर्पण ॥४॥**

दररोज संकल्प करून श्रद्धाभक्तिभावयुक्त मनाने ११ वेळा हा अभंग म्हणायचा. ही सेवा ८ दिवस नियमाने करावयाची. सेवा करताना नेहमीप्रमाणे धूप, दीप, नैवद्य, आसन आदि नियम पाळावयाचे. सोसायटीच्या चेअरमनाना उद्देशून एक छोटे, परंतु वस्तूस्थिती स्पष्ट करणारे पत्र लिहून दिले. त्यांच्या झेरॉक्स कॉपीज जनरल बॉडीच्या सर्व सदस्यांना देण्याची सूचना केली. ४ दिवस सेवा, रुजू झाल्यावर ते पत्र चेअरमनना सादर करावयास सांगितले. कावळे यांनी सूचनेनुसार सर्व गोष्टी केल्या. १५ दिवसांनी झालेल्या

सोसायटीच्या जनरल बॉडीच्या मिटिंगमध्ये पत्र वाचून दाखविले. सभासदांच्या हाती पत्राच्या झेरॉक्स प्रती होत्याच. चेअरमनच उत्स्पूर्तपणे म्हणाले, 'छे, छे. ह्या सज्जन गृहस्थाला त्रास होता कामा नये. स्पेशल केस म्हणून सोसायटीने काहीहि रक्कम न घेता देशपांड्यांच्या नावे असलेला फ्लॅट श्री. कावळे यांच्या नावावर करून द्यावा. मी ठराव मांडतो, काय हो, गुप्ते, तोंडवळकर, जोशी, आपटे, पाटील तुमचं काय म्हणणं आहे ?' सर्वांचे हात वर झाले. एकमताने रीतसर ठराव मंजूर झाला !

'आड घाली सुदर्शन' ह्याचा प्रत्यय कावळेसाहेबांना आला. ठरावाला विरोध करून 'त्यांच्या मित्रांनी' स्वतःचे हसे करून घेतले नाही !

## पडता जडभारी . . . .

परगावाहून मुंबईत येऊन एका खाजगी संस्थेत नोकरी करणाऱ्या तरुणाने युनियन तयार करून वर्षानुवर्षे जाचक अटी, नियमांच्या वरवंट्याखाली भरडून निघणाऱ्या नोकरवर्गाला जागं केलं. स एकजुटीने उभे राहिले. अधिकारी सर्वांनाच त्रास देऊ लाग विशेषतः संसारी स्त्रियांना तर त्यांनी धारेवरच धरलं. सामुदायि रजा, मंदगतीने काम, जेवणाच्या सुट्टीत घोषणा, शह काटशह झाले आणि सापळा रचून छोट्याशा चुकीसाठी त्याला–अविना ओगलेला–पोलीस स्टेशनच्या 'लॉक-अप'मध्ये टाकण्यात सं चालक यशस्वी झाले. 'पेइंग गेस्ट' म्हणून राहाणाऱ्या ह्या माणस





जामीन देतो कोण ? शुक्रवारी रात्री पकडलं. शनिवारी जामीन मिळवण्यासाठी धांवाधाव करून यश येणार नाही. रविवार, सोमवार (बँक हॉलिडे) सुट्टी. २ / ३ दिवस हा लॉक-अपमध्ये खिचडी खाईल, मग येईल ताळ्यावर !

रात्री अविनाशने **'पडता जडभारी । दासीं आठवावा हरी'** ह्या अभंगाचा घोष सुरु केला. पहाटे त्याचा डोळा लागला. 'एक आश्वासक, आशीर्वाद देणारा हात त्याला दिसला. सुगंधाची लाट उसळली.' त्याचे डाळे भरून आले. सकाळी बापटकाकांना पोलीस स्टेशनात पाहून तो थक्कच झाला. त्यांच्या मागे सानेमामा होते. एका रिटायर्ड पोलीस ऑफिसरने (बापटकाकांनी) केस बाबत विचारणा सुरु करतांच साराच बुरूज ढासळला !

घरी आल्यावर अविनाश, बापटकाका, सानेमामा चहापाणी घेत असताना सानेमामा म्हणाले, 'तुझ्या ऑफिसमधल्या तेंडुलकरबाईंनी काल तुला पकडल्याचं मला फोनवर सांगितलं. पण मी म्हातारा काय करणार ? एका दोघांना फोन केले. कुणीच हालचाल करीना. झोपलो उशीरा. पहाटे स्वप्नात एका तेजस्वी म्हाताऱ्याने थापट मारून उठवले आणि बापटकाकांच नाव सांगितलं, 'चल, उठ,' म्हणून दमहि भरला.

अविनाश एकटक देव्हाऱ्याकडे पहात होता. त्याचे डोळे पाझरत ते.

अत्यंत बिकट अवस्थेत, **'पडता जड भारी . . . '** ह्या अभंगाचा योग करावा.

**'धांव घाली विठू आतां । चालू नको मंद ॥'**

अशी आळवणी तुम्हीहि करू शकता, भावांत ओलेचिंब भिजून !

★ ★ ★

## हाहि एक मृत्युंजय मंत्रच आहे !

स्वत: साधना उपासना करणे हेच सर्वांत उत्तम. बऱ्याच वेळा पुरोहितामार्फत (ब्राह्मणद्वारे) आपण धर्मकृत्य करवून घेतो. ब्राह्मणसंकल्पपूर्वक आपले धर्मकृत्य करतात, पण त्यात 'मोले घातले रडाया । नाही आसू आणि माया ' हा भाग, थोडा–फार का होईना, असतोच. मग करायचे काय? जेथे जेथे आपण स्वत: उपासना करू शकूं, ते कृत्य स्वत: करावयाचे !

आवडत माणूस आसन्नमरण असल की त्याच मरण टळाव म्हणून आपणाकडे

**'ॐ त्र्यंबकं यजामहे, सुगंधिं पुष्टिवर्धनम् ।**
**उर्वारूकमिव बंधनान्मृत्योर्मुक्षीय मामृतात् ।'**

ह्या संस्कृत मृत्युंजय मंत्राचा जप करण्यात येतो. तो स्वत: करणे उचित. परंतु ज्याना संस्कृत येत नसेल त्यांनी काय करायच ?

त्यासाठी संकल्पपूर्वक, सर्व उपचार करून (उदबत्ती, निरांजन लावून, आसनस्थ होऊन) खालील अभंगाचा किमान ३५ हजार जप करावा व अनुभव घ्यावा.





**'जन्म-मरणांची कायसी चिंता ।**
**तुझ्या शरणागता पंढरीनाथा ॥**
**वदनीं तुझें नाम अमृतसंजिवनी ।**
**असतां चक्रपाणी भय कवणा ॥१॥**

**हृदयीं तुझें रूप बिंबलें साकार ।**
**तेथें कोण पार [1] संसाराचा ॥**
**तुका म्हणे तुझ्या चरणांची [2] पाखर ।**
**असतां कळिकाळ पायांतळीं ॥२॥'**

अशावेळी संकल्प कसा असावा ?

'आमच्या कुटुंबातील अमुक अमुक व्यक्ति आसन्नमरण आहे. हे सर्वशक्तिमान, दयासागर प्रभो, ही व्यक्ति आमच्या कसल्याहि ऋणांत नाही (म्हणजेच आमची ह्या व्यक्तिपासून कसलीहि अपेक्षा नाही) मी आणि माझ्या सर्व कुटुंबियांच्या अंतिम कल्याणाच्या दृष्टीने ह्याच्या आजाराबाबत जे तुला हितकारक वाटते, ते तू (ह्या व्यक्तिबाबत) घडव. ती चांगली झाली तर ती आम्हाला हवीच आहे. तिची यथाशक्ति, यथामति सेवा आम्ही करूच, अन्यथा तिला मुक्ती देणे तुला इष्ट वाटत असेल, तर त्या जीवाला अधिक कष्ट न होता, मुक्ती दे. तू सर्वज्ञ आहेस. सर्वांचे मंगल कल्याण करणारा आहेस. ज्यांत, आजारी माणसासकट, सर्वांचे कल्याण आहे, ते तूं घडवावेस अशी तुझ्या चरणी विनम्र प्रार्थना करतो.'

आपण आपले काम (जप) करावें. परमेश्वरावर पूर्ण विश्वास ठेवून

निवांत व्हावे. कर्ता—करविता तोच आहे. माझे हित—अनहित त्याला कळते, ह्याची खात्री झाल्यावर आग्रह कशाला हवा ? नव्हे, नव्हे तो राहाणारच नाही !

१ पाठ २ नमाची

## ॥ पुत्रप्राप्तिकरं श्रीमहालक्ष्मीस्तोत्र ॥

अनाद्यनन्तरूपां त्वां जननीं सर्वदेहिनाम् ।
श्रीविष्णुरूपिणीं वंदे महालक्ष्मीं परमेश्वरीम् ॥१॥

नामजात्यादिरूपेण स्थितां त्वां परमेश्वरीम् ।
श्रीविष्णुरूपिणीं वंदे महालक्ष्मीं परमेश्वरीम् ॥२॥

व्यक्ताव्यक्त स्वरूपेण कृत्स्नं व्याप्य व्यवस्थिताम् ।
श्रीविष्णुरूपिणीं वंदे महालक्ष्मीं परमेश्वरीम् ॥३॥

भक्तानंदप्रदां पूर्णां पूर्णकामकरीं पराम् ।
श्रीविष्णुरूपिणीं वंदे महालक्ष्मीं परमेश्वरीम् ॥४॥

अन्तर्याम्यात्मना विश्वमापूर्य ह्रदि संस्थिताम् ।
श्रीविष्णुरूपिणीं वंदे महालक्ष्मीं परमेश्वरीम् ॥५॥

सर्वदैन्य विनाशार्थं लक्ष्मीरूपां व्यवस्थिताम् ।
श्रीविष्णुरूपिणीं वंदे महालक्ष्मीं परमेश्वरीम् ॥६॥

भुक्तिं मुक्तिं च दातुं संस्थितां करवीरके ।
श्रीविष्णुरूपिणीं वंदे महालक्ष्मीं परमेश्वरीम् ॥७॥





सर्वाभयप्रदां देवीं सर्वसंशयनाशिनाशिनीम् ।
श्रीविष्णुरूपिणीं वंदे महालक्ष्मीं परमेश्वरीम् ॥८॥

*॥ इति श्रीकरवीरमाहात्म्ये श्रीपराशरकृतं पुत्रप्राप्तिकरं श्रीमहालक्ष्मी स्तोत्रं संपूर्णम् ॥* ★

हे स्तोत्र उदबत्ती, तुपाचा दिवा लावून, दुध—साखरेचा नैवेद्य देवाला अर्पण करून सकाळ व संध्याकाळ किमान १६ वेळा (प्रत्येकी) म्हणावे. ही उपासना किमान १६ महिने वा ३२ महिने करावी. स्तोत्र श्रद्धापूर्वक, भावपूर्ण, तन्मय होऊन म्हणावे. माता श्रीमहालक्ष्मी इष्ट फळ देईल.

★ ★ ★

## जमिनीचा प्लॉट (तुकडा) फलद्रुप होईल कां ?

जी जमीन आपणाला राहत्या जागेसाठी वा अन्य उद्योग व्यवसायासाठी घ्यावयाची असेल, तेथे सर्वप्रथम एक तोडगा करून पहावा. ज्याच्या नावे खरेदीचा व्यवहार होणार असेल, त्याने त्याच्या [illegible]मध्या हाताच्या लांबीइतका लांब, रुंद व खोल असा खड्डा जमिनीत [illegible]णावा वा खणून घ्यावा. त्यात सूर्यास्त समयी खड्डा भरून पाणी [illegible]लावे. दुसरे दिवशी सकाळी तो खड्डा पहावा. त्यात अर्धा खड्डाभर [illegible]णी शिल्लक असल्यास, तो प्लॉट उत्तम समजावा. पाणी झिरपून [illegible]न थोडा तरी ओलसर भाग वा चिखल शिल्लक असेल तर तो [illegible]ट मध्यम समजावा. पाणी सुकून जाऊन खड्ड्यांत जमिनीला

भेगा पडल्या असतील तर तो प्लॉट अनिष्ट समजावा.

**किंवा**

अंदाजे गुडघाभर खोल खणून एक छोटा खड्डा, संकल्पित जमिनीत, खणावा व त्याची माती बाजूलाच टाकावी. नंतर त्याच मातीने खोदलेला खड्डा भरावा. माती खड्ड्याच्या वरपर्यंत आल्यास जागा लाभदायक ठरते. माती खड्ड्याच्या बरोबर आल्यास सदरहू जागा मध्यम प्रतीची समजावी आणि माती खड्ड्याच्या संपूर्ण उंचीपेक्षा कमी भरल्यास ती जागा निकृष्ट प्रतीची समजावी.

जागेत (प्लॉटमध्ये) वड, औदुंबर, पिंपळ, बेल आदि पुण्यवृक्ष, दुर्वा, तुळस आदि असल्यास प्लॉट लाभदायक समजावा. जागेत निवडुंग, करवंद, आघाडादि वृक्ष नसावेत.

वरील माहिती सामान्यपणे – ढोबळमानाने – दिली आहे, तपशीलासाठी जाणकार व्यक्तीचा सल्ला घेणे इष्ट.

★ ★ ★

## घर पहावें बांधून . . .

नवीन घर बांधताना मुख्य दरवाजाची लाकडी फ्रेम कधी लावावी हेहि बांधकाम कंत्राटदारांनी समजून घेतले पाहिजे. खाली[illegible] नक्षत्रांवर व तिथीला फ्रेम बसविल्यास ते घर नांदते होते. त्या[illegible] वास्तव्य करणाराला सर्वांगीण यश प्राप्त होते, असे भारती[illegible] ज्योतिषशास्त्र आवर्जून सांगत.

वास्तूपुरुषाच्या मस्तक दिशेकडे गृहाचे द्वार करावें. [illegible]





भाद्रपद, आश्विन, कार्तिक ह्या महिन्यांत तो पूर्वेकडे मस्तक करून झोपतो.

मार्गशीर्ष, पौष, माघांत तो दक्षिणेस,

फाल्गुन, चैत्र, वैशाखात तो पश्चिमेस,

ज्येष्ठ, आषाढ, श्रावणांत तो उत्तरेस तोंड करून झोपतो.

वृषभ, वृश्चिक, मेष व तूळ ह्या राशींत सूर्य असता दक्षिणेस किंवा उत्तरेस आणि कुंभ, मकर, कर्क व सिंह ह्या राशींत सूर्य असता पूर्वेस वा पश्चिमेस गृहाचे द्वार करावें. **शक्यतो कार्तिक महिन्यांत घर बांधू नये.** पूर्वेकडे द्वार न करण्याच्या तिथ्या. पौर्णिमेपासून कृष्ण अष्टमी. पश्चिमेकडे, अमावास्या ते शुक्ल अष्टमी. दक्षिणेकडे, शुक्ल नवमी ते शुक्ल चतुर्दशी. उत्तरेकडे, कृष्ण नवमी ते कृष्ण चतुर्दशी.

★ ★ ★

**प.प. श्रीवासुदेवानंद सरस्वती स्वामीमहाराज विरचित**

## करुणात्रिपदी

प. प. श्रीवासुदेवानंद सरस्वती स्वामीमहाराजांनी वारंवार समजावूनहि श्रीक्षेत्र नृसिंहवाडी येथील ब्राह्मण बेताल झाले. आचारभ्रष्ट होऊ लागले. तेव्हा श्रीदत्तप्रभू संतप्त झाले. रोगराई, अवर्षणाने वाडीतील सर्वांना जीवन असह्य झाले. आता काय करावे ? सर्व चिंतातूर झाले. श्रीमहाराजांचा चातुर्मास ज्या गांवी होता तेथे काही प्रतिनिधी रवाना झाले. समक्ष भेटीत सर्व परिस्थिती निवेदन करण्यांत आली.

श्रीमहाराजांनी श्रीदत्तप्रभूंना सांकडे घातले. चुकली तरी ती आपलीच लेकरे आहेत. सांभाळून घ्या, म्हणून कळवळून सांगितलं. परोपरीने विनवले. ह्या अनन्यशरण भावांतून उत्स्फूर्तपणे अवतरली ती ही करुणात्रिपदी ! सर्व दत्तस्थानांत प्रार्थनेच्यावेळी ती आवर्जून म्हणतात. तेथील चाली निरनिराळ्या असल्या तरी 'भाव' मात्र एकच असतो.

★ ★ ★

## करुणात्रिपदी

(चाल : उद्धवा शांतवन कर .....)

शांत हो श्रीगुरुदत्ता मम चित्ता शमवी आतां ॥ धृ ॥
तूं केवळ माता जनिता, सर्वथा तूं हितकर्ता ॥
तूं आप्त स्वजन भ्राता, सर्वथा तूंचि त्राता ॥ चाल ॥
भयकर्ता तूं भयहर्ता ॥ दंडधर्ता तूं परिपाता ॥
तुज वांचुनि न दुजी वार्ता ॥
तूं आर्ता आश्रय दत्ता ॥ शांत हो ॥१॥
अपराधास्तव गुरुनाथा, जरि दंडा धरिसी यथार्था ॥
तरि आम्हीं गाऊनि गाथा, तव चरणीं नमवूं माथा ॥ चाल ॥
तूं तथापि दंडिसि देवा ॥ कोणाचा मग करुं धांवा ॥
सोडविता दुसरा तेव्हां ॥ कोण दत्ता आम्हां त्राता ॥ शांत हो ॥
तूं नटसा होउनि कोपी, दंडिताहि आम्ही पापी ॥
पुनरपिही चुक्त तथापि, आम्हांवरि नच संतापी ॥ चाल ॥



॥ श्रीगुरु:शरणम् ॥

गच्छत: स्खलनं क्वापि ॥ असें मानुनि नच हो कोपी ॥
निजकृपालेशा ओपी ॥ आम्हांवरी तूं भगवंता ॥ शांत हो ॥२॥

तव पदरीं असतां ताता, आडमार्गी पाउल पडतां ॥
सांभाळुनि मार्गावरता, आणिता न दुजा त्राता ॥ चाल ॥
निज बिरुदा आणुनि चित्ता ॥ तूं पतीतपावन दत्ता ॥
वळे आतां आम्हांवरता ॥ करुणाघन तूं गुरुनाथा ॥ शांत हो ॥४॥

सहकुटुंब, सहपरिवार, दास आम्ही हे घरदार ॥
तव पदीं अर्पु असार, संसाराहित हा भार ॥ चाल ॥
परिहरिसी करुणासिंधो ॥
तूं दीनानाथ सुबंधो ॥ आम्हां अघलेश न बाधो ॥
वासुदेवप्रार्थित दत्ता ॥ शांत हो ॥५॥

## पद

(चाल : इस तन धनकी)

श्रीगुरुदत्ता जय भगवंता ॥ तें मन निष्ठुर न करी आतां ॥धृ॥ चोरें [द्वि]जासि मारिता मन जें, कळवळलें तें कळवळों आतां ॥१॥
[पो]टशुळाने द्विज तडफडतां, कळवळलें तें कळवळो आतां ॥२॥
[द्वि]जसुत मरतां वळलें तें मन, हो कीं उदासिन न वळे आतां ॥३॥
[स]तिपति मरतां काकुळति येतां, वळलें तें मन न वळे कीं आतां ॥४॥
[श्री]गुरुदत्ता त्यजिं निष्ठुरता, कोमलचित्ता वळवीं आतां ॥५॥

## पद

**जय करुणाघन निजजन जीवन,**
**अनसूयानंदन पाहि जनार्दन ॥धृ॥**
**निज अपराधें उपराठी दृष्टी,**
**होऊनि पोटीं भय धरूं पावन ॥१॥**
**तूं करुणाकर कधी आम्हांवर,**
**रुससी न किंकरवरद कृपाघन ॥२॥**
**वारी अपराध तूं मायबाप,**
**तव मनीं कोपलेश न वामन ॥३॥**
**बालकापराधा गणे जरि माता,**
**तरी कोण त्राता देईल जीवन ॥४॥**
**प्रार्थी वासुदेव पदीं ठेवीं भाव,**
**पदीं देवो ठाव देव अत्रिनंदन ॥५॥**

घरांतील भावनिक अशांतता, द्रव्यचिंता, आनंद, समाधान, तृप्तीचा अभाव वगैरे चिंता नष्ट करून सर्वार्थाने समर्थ होण्यासाठी सकाळ, दुपार आणि संध्याकाळ **तीन वेळेला** संकल्प करून अत्यं भावपूर्ण अवस्थेत, ही **करुणात्रिपदी**, त्यातील अर्थाशी समर होऊन, किमान १ वर्ष म्हणावी. नेहमींचे सर्व उपचार करावेत. सुख आनंदवर्धक, प्रेरक अनुभव येतील. साधकांनी अवश्य अनुभव घे पहावा. **श्रीदत्तसंप्रदायांतील ही हेमगर्भाची मात्रा आहे !**

महाराष्ट्रात, श्रीदत्तसंप्रदायातील बऱ्याच मंडळींच्या घरांत उपासना नित्य नियमानें, आवर्जून केली जाते.

★ ★ ★





## अन्न–उदकाची केली असे सोय .....

दादरला (मुंबई १४ विभागांत) राहाणारे माझे मित्र श्री. अनंतराव वैद्य यांच्या हुशार, सुविद्य मुलाला–अविनाशला–खूप प्रयत्न करूनहि नोकरी वा योग्य व्यवसाय मिळत नव्हता. २९ वर्षांचे वय झाले. याच कस होणार ? हा एकच विचार वैद्य दाम्पत्याला बेचैन करी. त्याला **करुणात्रिपदी**–त्रिकाळ–६ महिने म्हणावयास सांगितली. तिसऱ्यांच महिन्यात एका इंजिनियरिंग फर्ममध्ये सेल्स इंजिनियर म्हणून त्याला नोकरी मिळाली. ३ वर्षानंतर आता तो कामात वाकबगार बनला आहे. त्याचा आत्मविश्वास दुणावला आहे. **पुणे** जिल्ह्याच्या सेल्सची संपूर्ण जबाबदारी त्याच्यावर सोपविण्यात आली आहे. अजूनहि दररोज सकाळ, संध्याकाळ अविनाश **करुणात्रिपदी** म्हणतो ! (दुपारी घरांतील मंडळी म्हणतात.)

★ ★ ★

## सकल जीवांचा करितों सांभाळ . . .

पस्तीशीच्या उंबरठ्यावर असताना श्री. अनघा देशपांडे ह्या **मुंबई**तील तरुणीचे यजमान श्री. अनंत देशपांडे अपघाती निधन **पावले**. अनघाचे सासू–सासरे पूर्वीच कालवश झालेले. घरांत **कुणाचा** आधार नाही. पदरांत दोन लहान मुले. कस जीवन **जगायच** ? ती भांबावून गेली. मुंबई महानगरपालिकेतील **कारकू**नाची नोकरीहि ती नीट करू शकत नव्हती. सारेच गंमत पहात . छळत होते. मदतीसाठी कुणाचाहि हात पुढे येत नव्हता.

त्यावेळीं ........ **करुणात्रिपदीच्या** 'त्रिकाळ' उपासनेने तिला हात दिला. तिचा मानसिक तोल सावरला गेला. ती खंबीर झाली. आज, वर्षभरानंतर, ती आत्मविश्वासाने, कणखरपणे आपलं जीवन आनंदाने जगत आहे. मुलांना आईची ममता आणि बाबांचा आधार देण्यांत, आता ती समर्थ झाली आहे.

**'हें तो प्रचितीचें बोलणें। विरळा भाग्यवंत जाणे ॥'**

★ ★ ★

## आनंदाचा सुगंध दरवळला . . .

'स्वामी, घरांत आम्ही चवघं कमावणारे. काय कमी आहे आम्हांला ? पैसा आहे, प्रतिष्ठा आहे, विद्या आहे. सन्माननीय उद्योग व्यवसाय आहे. सारं आहे, पण .......' राजाभाऊ फडके थोडे थांबले. त्यांनी आंवढा गिळला. डोळे पुसले.

त्यांच्या खांद्यावर थोपटत, त्यांना शांत करीत मी म्हणालो, '**पण** घरांत शांति नाही, समाधान नाही ! रोज कटकट. वादावादी. **कोणी** कोणाचा शद्ब खाली पडू देत नाही. असंच ना ?'

'अगदी बरोबर. मुलगी डॉक्टर म्हणून, मुलगा सी.ए. **म्हणून** पत्नी प्रोफेसर म्हणून आपल्याच तोऱ्यांत. सुखानं चहा प्याय[illegible] म्हटला तर ......'

'जाऊ द्या, राजाभाऊ. तुम्ही उद्यापासून सकाळ, **दुप**[illegible] संध्याकाळ थोरल्या स्वामीमहाराजांची, **'करुणात्रिपदी'** म्हणाय[illegible] सुरुवात करा. किमान वर्षभर ही सेवा खंड न पडता करा. **अनु**[illegible] घ्या.'





'दुपारी कसं जमणार ?'

'फॅक्टरींत तुम्ही तुमच्या केबीनमध्ये म्हणा. घरी बाळकोबा आचाऱ्याला म्हणायला सांगा. उदबत्ती, तुपाचा दिवा लावून, थोडं मोठ्याने म्हणायच, आपल आपल्याला ऐकू येईल इतपत. त्यानं वाचाशुद्धि, तनुशुद्धि, वातावरणशुद्धि होईल.'

'उदबत्तीची विभूति पाण्यांत टाकून ते पाणी सर्व घरभर शिंपडलं तर ?'

'अहो, फारच छान. सेवा करताना 'निश्चित वेळ' ठरवून करावी.'

'त्यानं काय होईल ?'

'उपास्य देवतेची उपस्थिती जाणवेल. चैतन्याचे, मंगलमयतेचे, आनंदमयतेचे सम्यक् दर्शन घडेल. राजाभाऊ, चर्चा किती करणार ? तुम्ही सुरवातच करा.'

राजाभाऊंनी निष्ठेने उपासनेस सुरुवात केली. वर्ष पूर्ण व्हायच्या आंतच ते एकदा रस्त्यांत मला भेटले. माझे दोन्ही हात हातांत घेऊन त्यांनी प्रेमाने दाबले. आनंद त्यांच्या चेहऱ्यावर फुलून आला होता. 'आता मी खूप सुखांत आहे, स्वामी. माझ्या घराचे आनंदभुवन झाले आहे !'

'ही सारी थोरल्या स्वामीमहाराजांची कृपा. राजाभाऊ, उपासना सोडू नका, हं.' मी म्हणालो.

उत्तरादाखल राजाभाऊंनी हात जोडले. त्यांचे डोळे भरून आले [illegible]ते.

★ ★ ★

## प्रतिवर्षी आपल्या घरीं येणाऱ्या पार्थिव श्रीगणेशाची प्रार्थना

हे गौरीनंदना, गुणेशा, तूं विघ्नविनाशक, गजानन, लंबोदर, भालचंद्र आदि विविध अवतार घेऊन भक्तांचे संरक्षण, संवर्धन करून दुष्ट, विघातक शक्तींचे सदैव पारिपत्य करीत आला आहेस. तुला कोटी कोटी प्रणाम !

प्रतिवर्षाप्रमाणे ह्याहि वर्षी यथाशक्ति, यथामति, हाती आलेल्या पत्रं, पुष्पं, फलं, तोयं (पाणी) आदि सामुग्रीने आम्ही तुझे पूजन, वंदन, नैवेद्य समर्पण आदि कार्ये मोठ्या निष्ठेने, प्रेमाने, सेवाभावाने तुझे चरणी अर्पण केली आहेत. त्यांचा स्वीकार कर. त्रुटींकडे लक्ष न देता. कृपावंत, वरदवंत, दयाघन, करुणासागर होऊन आम्हाला पोटाशी घे. तुझ्या निरंतर, अविच्छिन्न, अविरत, अखंड कृपेचा वर्षा आमचेवर करून आम्हाला सर्वार्थाने कृपापात्र बनव. अखं श्रीचरणसेवारत ठेव. व्यवसाय, उद्योग, विद्या, व्यवहार, साधना सेवा, दान, सुश्रुषा, चिंतन, मनन, भक्ति, योग, ज्ञान आदि सर्व-स व्यवहारांत सर्वोत्तम, नेत्रदीपक यश दे.

निरंतर आपली, माता–पिता–आचार्य आदि वडीलधाऱ्यां श्रद्धाभक्तियुक्त अंतःकरणाने, लहानग्यांची ममतेने, स्नेहांकित होऊ जिव्हाळ्याने सेवा करवून घ्या. आम्हाला सदैव यशवंत, जय वरदवंत, प्रज्ञावंत, श्रद्धावंत, निर्भिड, स्वकार्यकुशल करा. ठेवा

तुमच्या पावन, प्रतापी, प्रेमळ, प्रेरक चरणयुगलांना पुन्हा को कोटी वंदने ! पुढच्या वर्षी लवकर या.





## 'ॐ श्रीं नमः ।'

दर शुक्रवारीं, सायंकाळीं दिवे लावण्याच्या वेळेस, देवांसमोर एक छोटा पाट मांडावा किंवा आसन ठेवावें. त्या आसनावर, ताटलींत १/२ सोन्याचे दागिने ठेवावेत. साक्षात श्रीमहालक्ष्मी आपल्या घरीं आली आहे, असें मनोमन समजून, त्या दागिन्यांवर हळद-कुंकू वाहून, फुलं वाहून, त्यांना उदबत्ती, तुपाच्या निरांजनाने ओवाळावें आणि दूध-साखरेचा नैवेद्य अर्पण करावा.दूध साखरेसोबत छोट्या भांड्यात पिण्यासाठीं पाणीही ठेवावें. नंतर....

'ॐ श्रीं नमः ।'

हा सर्वांगीण समृद्धि, संपन्नता, मंगलमयता, सात्त्विकता देणारा मंत्र किमान १०८ वेळा (१ माळ) म्हणावा. बाराही महिने हें व्रत करावें. घरांत विपुल धन, धान्य येईल. घरांतील मंडळींना उत्तम आरोग्य लाभेल. घराला शांति, समाधान, आनंद, तृप्तीचा लाभ होईल. वैचारिक सामंजस्य वाढेल. घरांत येणाऱ्या, जाणाऱ्या मंडळींत वाढ होऊन, त्यांचं हार्दिक स्वागत, घरांतील मंडळी करतील. सात्त्विक वृत्तींत वाढ होऊन, दीन-दुबळ्यांना साहाय्य करण्याची प्रवृत्ती वाढेल. अखंड, सलग ८ शुक्रवारीं हें व्रत केल्यास, सुरवातीला चित्त प्रसन्न करणारे, थोडे थोडे अनुभव येऊ लागतील.

स्त्री-पुरुष कोणीही हें व्रत करावें आणि आनंद साम्राज्याचा धनी व्हावें. मग, आपण करणार ना हें व्रत ?

★ ★ ★

## सुयोग्य वरप्राप्तीसाठीं

**संकल्प :**

'हे गौरीमाते, मी तुझें लेकरूं आहें. कृपावंत होऊन सर्वार्थानें समर्थ, संपन्न असलेला, तुला सुयोग्य वाटेल असा, तरुण मुलगा, लवकरांत लवकर पती म्हणून मला प्राप्त व्हावा आणि रहावा, अशी तुमच्या पावन, प्रतापी चरणीं मीं प्रार्थना करते आहे. मला पोटाशीं घे. कृपा कर.'

**'हे गौरी, शंकरार्धांगी यथा त्वं शंकरप्रिया ।**
**तथा मां कुरू कल्याणी कान्तकान्ताम् सुदुर्लभाम् ॥'**

दररोज ह्या मंत्राच्या ११ माळा जप करावा. लाभ होईल.

★ ★ ★

## नेत्रदीपक यशासाठीं....

व्यवसायांत, नोकरींत नेत्रदीपक यश लाभावें म्हण[illegible] श्रद्धाभक्तीयुक्त अंत:करणाने, व्यवसाय, नोकरीच्या जा[illegible] खालील मंत्र, दररोज २१ वेळा, किमान ६ महिने, न चु[illegible] म्हणावा आणि अनुभव घ्यावा.

**' नमो नमो भास्कराय ।**
**आदित्यनारायणाय ते नमः ॥ '**

★ ★ ★





## गर्भाचें आणि गर्भवतीचें रक्षण होण्यासाठीं

रात्रौ झोंपण्यापूर्वी, गर्भवतीनें आपल्या बेंबीत एक थेंब खोबरेल तेल घालून, खालील संकल्प म्हणून, एकदांच खालील मंत्र म्हणून, डावीकडून उजवीकडे पूर्ण, एकदां आपल्या पोटावरून हात फिरवावा.

**संकल्प :**

'हे सर्वशक्तिमान, दयाघन, करुणासागर, नाथश्रेष्ठा, तुम्ही माझे आणि माझ्या गर्भाचें रक्षण, पोषण, वर्धन, सर्वार्थानें संवर्धन करून, तुमच्या उपस्थितींत माझी प्रसूति, सुकर, सुलभ, योग्यवेळीं, निर्विघ्न, निरामय, मंगलमय, आनंदमय, सात्त्विक वृत्तींत करवून घ्या. माझ्यावर आणि माझ्या होणाऱ्या बाळावर आपली निरंतर कृपा ठेवा.'

**' ॐ चैतन्य श्रीमच्छिंद्रनाथाय नमः । '**

★ ★ ★

## वीर्यवृद्धी आणि अपत्यप्राप्तीसाठीं

सकाळीं उगवता शेंदरी सूर्य पाहून त्याचे साष्टांग नमस्कार करून, सर्व प्रथम दर्शन घ्यावें आणि खालील मंत्र प्रत्येकी १२ वेळा, दररोज, न चुकतां, किमान १ वर्षभर तरी म्हणून, अनुभव घ्यावा. लाभ होईल.

**१) 'उगवले दिनकर । उजव्या हातीं कमळ, डाव्या हातीं गदा । भानू, भास्करा तपोराजा । माझा नमस्कार श्रीसूर्यनारायणा तुला ।।'**

**२) 'आदिदेव नमोस्तुभ्यम् प्रसीद मम भास्कर । दिवाकरं नमोस्तुभ्यम् प्रभाकर नमोस्तुते ।।'**

श्रद्धाभक्तीयुक्त अंतःकरणानें ही सेवा होणें गरजेचें आहे.

★ ★ ★

## सुखरूप प्रवास होण्यासाठीं

प्रवास सर्वार्थाने सुखरूप व्हावा म्हणून, प्रवास सुरू करण्यापूर्वी, खालील मंत्राचा किमान ११ वेळा जप करून, मगच प्रवास सुरू करावा. शक्य झाल्यास जप करताना तुपाचा दिवा आणि उदबत्ती लावावी.

**'प्रबिसी नगर कीजे सब काजा ।**
**हृदय राखि कोसलपुर राजा ।।'**

प्रवास सुखावह होईल.

★ ★ ★





## सर्वांगीण समृद्धीसाठीं

**'ॐ नमो धनदायै स्वाहा ।'**

ह्या मंत्राचा, तुपाचा दिवा, उदबत्ती लावून एका बैठकीत १०,१०८ वेळा जप करावा; त्यानंतर तिजोरीवर अगर धान्यावर (धान्य पसरून ठेवून), प्रज्वलित तुपाचे निरांजन ठेवून, १००० वेळा हा जप करावा. पुढे जमेल तेव्हा १०८ वेळा जप करीत जावें. (रोज केला तर उत्तम) धन, धान्य, उत्तम आरोग्य, घरांतील शांतता, आनंद, समाधान, परस्परांतील भावनिक एकरूपता आदींचा लाभ होईल. नक्की.

★ ★ ★

## 'प्रथम तें स्वसंरक्षण........'

स्मशान, कबरस्थान वा अनोळखी उजाड जागा, डोंगराळ भाग, माळरान, अपरिचित प्रदेश आदि मधून प्रवास करताना, वातावरणशुद्धि बरोबरच स्वसंरक्षण व्हावें म्हणून खालील मंत्र किमान ११ वेळा म्हणावा आणि अनुभव घ्यावा.

**१) ॐ हं हनुमते रुद्रात्मकाय हुं फट् ।'**

किंवा

**२) 'श्रीराम, वीर हनुमान ।**
**मां रक्ष रक्ष हनुमान ।।'**

★ ★ ★

## 'बाळा,.........तुझ्यासाठीं !'

प्रसुतीनंतर बालक मृत्यू पावत असल्यास अथवा मृत बालक जन्मत असल्यास खालील मंत्र भोजपत्रावर, गोरोचन, कुंकु यांच्या शाईनें लिहून तें गर्भिणीच्या कमरेत ताईतांत घालून बांधावें. ताईतांत घालण्यापूर्वी * विधिपूर्वक पूजन करावें.

यंत्रांतील **'देवी'** या शद्वाच्या ठिकाणी गर्भिणीचें नांव लिहावें.

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ॐ | ऱ्हीं | क्लीं | स्त्रीं | हुं | फट् |
| रक्ष | गर्भं | देवी | गर्भं | रक्ष | रक्ष |
| स्वा | हा | श्रीं | क्लीं | फट् | हुं |

* श्रीमंगलमूर्ति, श्रीमहालक्ष्मी, श्रीमहासरस्वती, श्रीमहाकाली, श्रीअन्नपूर्णाआई, कुलदेवता....., कुलदेव...., (सासर, माहेरचे) गुरूपरंपरा, ग्रामदेवता, स्थानदेवता, इष्टदेवता, वास्तुदेवता, आदींचे कृतज्ञतापूर्वक स्मरण करून वरील यंत्राला उदबत्ती, निरांजनाने ओवाळून, नंतरच तें ताईतांत घालावें.

(कै.मा.डॉ.वसंतराव परांजपे, पुणें ह्यांच्या अपार सौजन्याने)

★ ★ ★





## ॐ औषधाय नमः।

'पाहिलेत कां स्वामी, अलकाचे पाय?' इंदिराकाकू व्यथित होऊन सांगत होत्या.

भेगाळलेले, रक्ताळलेले अलकाचे पाय पाहून मलाही वाईट वाटलं. 'दिसायला पोर चांगली आहे, पण ह्या पायांमुळें हिचं लग्न जमेना. डॉक्टर, वैद्य साऱ्या साऱ्यांचे उपचार करून झाले. वाला एवढाही गुण आला नाही. थंडीत तर प्राणांतिक वेदना होतात, पोरीला.'

चेहरा पाडून अलका माझ्यासमोर बसली होती. मी मनोमन थोरल्या स्वामीमहाराजांना (टेंब्येस्वामीमहाराजांना) प्रार्थना केली. त्यांनीच उपाय सुचवला.

'अलका तूं चिंता करूं नकोस. 'श्रीं'च्या कृपेने २ महिन्यांत तुझे पाय पूर्णपणे बरे होतील. मी सांगितलेलं करशील ?'

'नक्की, सांगा स्वामी.'

'ऐक तर, उदबत्ती, तुपाचा दिवा लावून, आसनावर बसून, खालील श्लोक पूर्ण श्रद्धेने, रोज सकाळीं १०८ वेळा म्हणायचा. उदबत्तीची विभूति साफ करून एका डब्यांत भरून ठेवायची.

**'दद्रुस्फोटककुष्टादि महामारी विषुचिका।**
**नश्यंत्यन्येऽपि रोगाश्च दत्तात्रेयं नमामि तम्।।'**

'इतकंच ना ?'

'ऐक ग पुरतं. एक पांढऱ्या कांचेची (प्लॅस्टिकची नको) छोटी बाटली घेऊन त्यांत अंदाजे १०० एम्.एल. शुद्ध खोबरेल तेल घालायचं. नंतर ती बाटली दररोज सकाळीं सूर्योदयाच्यावेळीं (शक्यतों शेंदरी सूर्य असतांना) सुमारे अर्धा तास उन्हांत ठेवायची. मंत्र म्हणतांना तयार झालेली, डब्यांत ठेवलेली, चिमूटभर विभूति घेऊन, त्यावर वरील बाटलीतील खोबरेल तेल घालून तें मिश्रण रोज रात्री झोंपतांना आणि सकाळीं उठल्यावर तुझ्या पायांना चोळून लाव, हे करत असतांना '**ॐ औषधाय नमः।**' असे किमान एकवेळ तरी म्हणत जा. (औषधांत देव आहेच) ताबडतोब सुरवात कर.'

'अवश्य करते.' असं म्हणून अलका मार्गस्थ झाली.

३/४ महिन्यांनी ती लग्नाची-पत्रिका घेऊनच माझ्याकडे आली ! ती पूर्णपणे रोगमुक्त झाली होती, त्यामुळें चटकन् तिचं लग्न जमलं. तूर्त ती वाराणसीला असून तिला २ मुले आहेत !

★ ★ ★





## 'श्रीदत्त जय दत्त ।'

एका प्रसन्न सकाळीं साधना आटोपल्यावर स्वस्थ बसलों होतों. इतक्यांत प.प. श्रीवासुदेवानंद सरस्वती (टेंब्ये) स्वामीमहाराजांचा स्पष्ट आदेश मिळाला.

'आज तुला एक सिद्ध मंत्र देतों आहें. त्याची तूं उपासना कर आणि ज्याला हा जप करावयास सांगशील, त्याला तुझ्या हस्ताक्षरांत तो लिहून दे.'

'महाराज, सिद्धमंत्र म्हणजे कसा?' मी थोडा चांचरत प्रश्न केला.

- **'दिगंबरा, दिगंबरा, श्रीपाद वल्लभ दिगंबरा ।'**
- **'श्रीपादश्रीवल्लभ नरहरी दत्तात्रेया दिगंबरा ।<br>वासुदेवानंदसरस्वती सद्गुरूनाथा कृपा करा ॥'**

हे दोनही सिद्ध मंत्र आहेत. ह्यांच्या उपासनेने फलप्राप्ती निश्चित होते. तुला देतों आहें, तो मंत्र असा,

## 'श्रीदत्त जय दत्त ।'

हाही एक सिद्धमंत्र असून कोणताही सत्संकल्प ह्या मंत्राने सफल होईल.

एकाजागीं बसून, उदबत्ती, तुपाचे निरांजन लावून, '**दिगंबरा, दिगंबरा...**' हा मंत्र किमान १८ हजार करावा.

**'श्रीदत्त जय दत्त'** हा मंत्र किमान ७० हजार करावा.

**'श्रीपादश्रीवल्लभ नरहरी...'** हा मंत्र किमान ४० हजार करावा.

यशाची निश्चित चाहूल लागेल, मात्र प्रत्यक्ष यश पदरांत पडलें नाहीं तर, जपसंख्या २ वा ३ पट करावी; व्यक्तिपरत्वे ह्यांत फरक होऊं शकतों.

★ ★ ★

## बालकाचें रडणें थांबविण्यासाठीं

तिन्हीसांजा (सायंकाळीं देवांजवळ दिवे लावण्याच्या वेळीं) लहान मूल रडत राहते. तें त्याचें रडणे बंद होऊन, ते हसूं खेळूं लागावें म्हणून विभूति (भस्म किंवा उदबत्ती जळून गेल्यावर उरलेली राखही चालेल.) हातांत घेऊन (उजव्या हाताच्या करंगळी जवळचें बोट आणि अंगठा त्यांच्या चिमटींत विभूति घेऊन खालील मंत्र किमान ११ वेळा म्हणून ती विभूति मुला लावावी. आवश्यक तो गुण येईल.

**ॐ नमो हनुमंता।**
**वज्रका कोठा ।।**
**जिसमे पिंड हमारा बैठा।**
**ईश्वरकुंजी ब्रह्मताला ।।**
**इस घट पिंडका।**
**यति हनुमंत रखवाला ।।**

★ ★ ★





## वीर्यदोष निर्मूलन

पुरुषामध्ये वीर्यदोष असेल वा तो संभोग-सुख नीटपणे उपभोगू शकत नसेल तर त्याने **''ॐ ब्रह्माण्यै नमः।''** ह्या महामंत्राचा किमान ३ लाख जप करावा. हा जप ठराविक दिवसात एकाजागी बसून करावा. (सुमारे २/२।। महिन्यांत) जप एकदम वाढवू नये. थोडा वाढवावा. एकदम वाढवल्यास उष्णतेचे विकार होतील. **ॐ** आणि **नमः** हे बीजमंत्र आहेत. जप करताना आपल्या डाव्या हाताला (म्हणजेच देवांच्या उजव्या हाताला) तुपाचे निरांजन, उदबत्ती अवश्य लावावी.

**'घृत दीप लावूनी एकांत। करता साधे प्रयोग ।।'**
(श्री दत्तमहात्म्य ६ वा अध्याय)

उपासना फलद्रुप होण्यासाठी तुपाचा दिवा लावणे आवश्यक आहे.

**सकस वीर्यवृद्धीसाठी खालील औषधी प्रयोग उपासनेसह करावा.**

पांढऱ्या **गोकर्णाची** ६ ताजी फुले, एक कप दूध अधिक १ कप पाणी ह्या मिश्रणात टाकून उकळावीत. उकळून हें मिश्रण एक कप करावें. (आटवावें)

आठवड्यातून दोनदा **बुधवारी-शुक्रवारी** ते पुरुषाला सकाळीं, अल्पशा खाण्यानंतर द्यावें. सुरुवात **बुधवारी** करावी.

किमान २ महिने (आठवड्यातून २ वेळा ह्याप्रमाणे) औषध घ्यावे. निश्चित गुण येतो.

ह्या प्रयोगाने गोव्यांत, महाराष्ट्रांत बऱ्याच जणांना अपत्यप्राप्ती झाली आहे. औषधी उपाययोजनेसोबत सकाळ, संध्याकाळ **'उध्दरि गुरुराया'** हे स्तोत्र किमान एक वेळ, अर्थाकडे लक्ष देवून म्हणावेच. त्यामुळे मानसिक संतुलन राहून संबंधित व्यक्तिला यशाची खात्री वाटते.

यश मिळण्यापूर्वी ते मिळेलच अशी वृत्ती तयार होणे अत्यावश्यक आहे. औषधाचे यश वृध्दिंगत होण्यास स्तोत्राचा नि:संशय फायदा होतो.

स्त्री-पुरुष संबंधात शारीरिक मीलना आधी मनोमीलन होणे इष्ट असतें. मानसिक ताण-तणाव नसावा. चित्तवृत्ती उत्साही, प्रसन्न, आनंदी असावी. हेच सारे निष्ठापूर्वक म्हटलेल्या **'उध्दरि गुरुराया'** स्तोत्राने अवश्य होते.

★ ★ ★





## करणी (वाममार्गी अघोरी काम) असफल करण्यासाठीं

आसनस्थ होऊन सर्वप्रथम दत्तकवच, शिवकवच, देवीकवच, श्रीगणेशकवच यापैकी कोणतेही एक म्हणून डाव्या हातांत पाण्याचें-पाणी भरलेले-भांडे घेऊन त्यांत उजव्या हाताचा अंगठा बुडवून **श्रीविष्णुसहस्रनाम**, मोठ्याने (आपले आपल्याला ऐकूं जाईल इतपत) म्हणावें. ते पाणी सहस्रनाम म्हणणाऱ्याने ३ वेळा पोटांत घ्यावें, त्यानंतर सर्व घरांत, घराबाहेर शिंपडावे. (जरुर तर अभिमंत्रित पाणी मोठ्या पातेलेभर पाण्यांत टाकून नंतर शिंपडावें) त्यातील थोडे पाणी स्वयंपाकांतही वापरावें. सर्वांत महत्वाचे म्हणजे **पाण्याचें कोणतेही भांडे जमीनीवर ठेवूं नये.** त्याखालीं आसन वा लाकडी पाट ठेवणे आवश्यक आहे; तसेंच हें कार्य करताना तुपाचा दिवा व उदबत्ती आवर्जून लावावी. सकाळ आणि सायंकाळ ही उपासना किमान १६ किंवा ३२ दिवस करावी. लाभ होईल.

★ ★ ★

## हें आहें तें सारें स्वामींचेच आहें

*'आबाजी, माणगांव दत्तमंदिराच्या तुम्हां विश्वस्तांना प्रत्येक मिटिंगसाठीं कांहीं भत्ता वगैरे रोख रक्कम मिळते कां?' एका भक्तानें सहज विचारलें.

'नाही'

'वर्गणी, देणगी मिळावी म्हणून तुम्ही स्वतः टेलिफोन करता, पत्रव्यवहार करता'

'बरं, मग?'

'तो खर्च तरी तुम्ही दत्तमंदिर ट्रस्टमधून घेता कां?'

'नाही'

'बऱ्याच वेळा मुंबईत, मुंबई बाहेर ट्रस्टच्या कामासाठीं जाता तेंव्हा प्रवासखर्च......'

'तोहि मी घेत नाही.' आबाजी नम्रतेनं म्हणाले.

'कां ? त्यांत काय चुकीचें आहे ?'

'अरे बाबा, माझ्याकडे जें कांहीं आहें. तें सर्वच स्वामींचें आहें, माझें त्यांत आहे काय ? आतां निराळें काय मागूं ?'

सहजपणे श्रीआबाजी बोलून गेले.

★ ★ ★

* कोंकणांतील श्रीदत्त आणि श्रीनाथ संप्रदायातील, एक थोर संतपुरुष.





## नामानुसंधान

'साधकानें शक्यतों एकट्यानें प्रवास करावा.' श्रीआबाजी गप्पा मारताना म्हणाले.

'रागावू नका हं, पण असं कां करायचं ?' अशोक थोड्या जिज्ञासेनं म्हणाला.

'नामाचं अनुसंधान ठेवण्यास सोपं जातं. कुठेही असा. कसेहि असा नामानुसंधान सुटूं नये.' श्रीआबाजी त्याला समजावीत म्हणाले.

'म्हणजे अगदीं जेवताना, काम करताना.....'

'कशी दिली हो भाजी? असं भाजीवाल्याला विचारल्यावर, तो उत्तर देतों त्यामधील काळ, भाजी घेतानाचा काळ, पैसे देतानाचा काळ, माझं नाम चालूंच असतं.' हंसून श्रीआबाजी म्हणाले.

'म्हणजे आतां चर्चा करतानाहि तें...'

'तें चालूंच पाहिजे, बरं' मिश्किलणे हंसत श्रीआबाजी म्हणाले.

**''नामापाशी भुक्ती मुक्ती ।**
**नामापाशी यश किर्ती ।।**
**नामापाशी विजय प्राप्ती ।**
**कर्म निर्मुक्ती हरिनामें ।।**

– संत श्रीएकनाथ महाराज

★ ★ ★

## श्रीगुरुचरित्र वाचन

नेहमीचे सर्व उपचार करुन, वाचन सुरु असताना अखंड तुपाचा दिवा ठेवून, श्रीसद्गुरूंसाठीं स्वतंत्र आसन ठेवून (हे दक्षिणेकडे तोंड केलेलें नसावें. साधकाच्या उजव्या हाताला असावें) स्वतः आसनस्थ होऊन **'श्रीगुरुचरित्राच्या'** (श्रीसरस्वती गंगाधरकृत) २ ऱ्या अध्यायाच्या पारायणास सुरुवात करावी. वाचन संपल्यावर **'श्रीं'** ना दूधसारखेचा नैवेद्य अर्पण करण्यास विसरु नये.

पहिल्या दिवशी पहिला व दुसरा अध्याय वाचावा. नंतर दररोज फक्त २ रा अध्याय, एक वेळ संपूर्ण वाचावा. असे ७ दिवस केले कीं २ ऱ्या अध्यायाचाच फक्त एक सप्ताह झाला! असे २८, ५२ किंवा जरुर तर २०८ सप्ताह करावेत. वाचन काळांत स्वप्नदृष्टांत, प्रत्यक्ष निरोप, पुस्तकाच्या वाचनाद्वारें, समक्ष कोणाची भेट होऊन त्याच्यामार्फत किंवा अन्य मार्गानें श्रीसद्गुरूंच्या भेटीचा योग येतो. कांही वेळा सेवाहि सुचविली जाते. श्रीं चें दर्शन घडतें, वारंवार दर्शनास जाण्यानें पुढील सेवा प्राप्त होते. श्रीसद्गुरूकृपेचा मार्ग सुकर होतो.

ज्यांना आपले श्रीसद्गुरू कोण हे माहित असतें. त्यांचे काम थोडें अधिक सोपें होतें अन्यथा आपले श्रीसदगुरू कोण? कुठले? आदिबाबत आवश्यक त्या सूचना मिळतात. पुढील वाटचाल अर्थातच साधकावर अवलंबून असते.

★ ★ ★





## रामकृष्ण हरि। विठ्ठल केशवा

कोणत्याहि संताला शरण जाऊन त्याच्या ग्रंथाच्या माध्यमांतून लाभलेली उपासना करुनहि श्रीसद्गुरुभेट व कृपालाभ होऊं शकतो. श्रीदत्त संप्रदाय आणि श्रीनाथ संप्रदाय दोन्हीची कृपा लाभून, खडतर साधना करुन, ज्यांनी आपलें जीवन धन्य केलं, ते माझे श्रीसद्गुरू प. पू. श्री. विठ्ठलराव यशवंतराव बांदेकर तथा श्रीआबाजी बांदेकर यांच्या जीवनातील हें पर्व मननीय, अनुकरणीय आहे.

श्रीसद्गुरु भेट होऊन, सेवा घडावी, कृपा लाभावी ही तळमळ तरुणपणीच श्रीआबाजींना व्याकुळ करीत होती. कोणाला गुरू करणार? कोणाकडे याचना करणार? विचार मनीं चमकून गेला. त्यांनी अनन्य शरण जाऊन श्रीतुकोबांनाच तुम्हीच माझे गुरू व्हा, ह्या बालकाला पदरांत घ्या, मार्गदर्शन करा अशी प्रार्थना केली आणि गाथा उघडली. समोरच अभंग होता. **रामकृष्ण हरि। विठ्ठल केशवा।। मंत्र हा जपावा। वेळोवेळी।।** श्रीआबाजींनी हाच अनुग्रह समजून मंत्रजप सुरु केला. सुमारे चार लाख जप झाल्यावर त्यांना स्वप्नदृष्टांत झाला. त्यांत दिंडी निघालेली त्यांनी पाहिली. भजनाचा गदारोळ सुरु झाला. हाणामारी झाली. एकतारी, टाळ, मृदुंग, झांजा साऱ्यांचे तुकडे तुकडे झाले. ते सर्व तुकडे गाऊं लागले, नाचूं लागले. आवाज एकच येत होता

'रामकृष्ण हरि। रामकृष्ण हरि।।' श्रीआबाजी ओरडत उठले. त्यांचं सर्व अंग घामानें भिजलं होतं. समोर पाहिलं तर तीर्थरूप श्रीभाऊ हंसत होते. पोटधरून हंसत होते, म्हणाले, 'काय झालं रे, आबा?' नंतर कणव येऊन म्हणाले 'होईल बरं तुझं काम.' त्या नंतर कांही कामासाठीं प.पू. श्रीभाऊ मुंबईस गेले. तेथून निरोप आला 'आबाला लगेच मुंबईला पाठवून द्या' नंतर श्रीनाथ आणि श्रीदत्त संप्रदायांतील ह्या संतश्रेष्ठानें मुंबईला श्रीबाबुलनाथ मंदिरात, आपल्या मुलाला, म्हणजेच श्रीआबाजींना संप्रदाय दीक्षा दिली.

★ ★ ★

## किरकोळ डोकेदुखींत आराम मिळण्यासाठीं

डाव्या हाताच्या तळव्यावर विभूति (भस्म) घेऊन, उजव्या हाताच्या करंगळी जवळचें बोट व अंगठा त्यांच्या चिमटीनं ती विभूति घेऊन खालील मंत्र किमान ११ वेळा म्हणून ती संबंधिताच्या कपाळाला चोळावी. (सकाळी, आवश्यक तर सायंकाळीही)

**हनुमान अंगद रन गाजे।**
**हाँक सुनत रजनी चर भाजे।।**

★ ★ ★





## सदगुरु वाचोनि सांपडेना सोय

कुटीचा दरवाजा बंद होता. बाहेर एक गौरकाय तरुण, तेजस्वी संन्यासी हात जोडून उभा होता. त्याच्या तोंडावर, कायेवर तपश्चर्येचं, विद्वत्तेचं, आचरणाचं तेज ओसंडत होतं. नजरेत करुणा आणि डोळ्यांत आसूं होते. रात्रभर तो तेथेंच तशा अवस्थेत उभा होता. डोळ्यांतून आसवं वहात होती. रात्रभर तो तेथेंच तशा अवस्थेत उभा होता. डोळ्यांतून आसवं वहात होती. पहाटें २।। च्या सुमारास कुटीचा दरवाजा कुरकुरला. एक दार उघडलं गेलं. एक तेजस्वी संन्यासी बाहेर आला. तरुण संन्याशानें त्याला दंडवत प्रणाम केला आणि त्याच्या चरणांवर एक श्लोक अर्पण केला. हें क्षणार्धांत घडलं. त्या किंचित् उग्र चेहऱ्यावर स्मित झळकलं. 'अरे बाळा, रात्रभर तूं इथंच उभा आहेस?' 'मग कोठें जाऊं? स्वामीराया, आपल्याशिवाय मला कोण आहे?' 'बरं, बरं. स्नान आणि नित्यकर्म उरकून ये.' त्या संन्याशानें किंचित हंसत उत्तर दिलं. तो पुढे पाऊल टाकणार इतक्यांत तो तरुण संन्यासी पुन्हा दंडवत प्रणाम करता झाला.

तो तरुण संन्यासी म्हणजे प.प. श्रीनृसिंहसरस्वती (दीक्षित) स्वामीमहाराज होते. प.प.श्रीवासुदेवानंद सरस्वती (टेंब्ये) स्वामीमहाराजांनीं आपणाला दीक्षापूर्वक दंड द्यावा म्हणून रात्रभर त्यांनी हें धरणें धरलें होते, लाडक्या शिष्याचे लाड, 'श्रीं'ची अनुमती घेऊन, थोरल्या स्वामीमहाराजांनी पुरवले. त्यांना

दंडदीक्षा झाली. ते दंडीसंन्यासी झाले! संन्यासात अनेक प्रकार आहेत. दंड (दीक्षित) धारी संन्यासी ही उच्च अवस्था आहे. श्रीदीक्षितस्वामींनी 'श्रीं' चरणीं अर्पण केलेलें हें सिद्धस्तोत्र अत्यंत प्रभावी आहे. भावपूर्ण, अनन्य शरणागतीनेंयुक्त आहे.

'नम्र झाला भूतां। तेणें कोंडिलें अनंता ।।'

**मेशं केशं सुशम्भुं भुवन वनवहं मारहं रत्न रत्नं ।**
**वन्दे श्रीदेवदेवं सुगुण गुरुगुरुं श्रीकरं कंज कंजं।।**
**मामज्ञं मत्तमर्भं भवदवसुवहं वासनासर्वसंघे।**
**मातः पातः सुतस्ते वहरहसि हरे देशिके शिष्यशिष्यं।।**

'भगवान्, विष्णू, ब्रह्मदेव व शंकर या त्रिमूर्तिरूप असलेल्या, सर्व वेद व तदुद्भूत चतुर्दश भुवनें धारण करणाऱ्या, (सौंदर्यानें) मदनाला पराभूत करणाऱ्या, (स्वयंप्रकाशी अशा उत्कृष्ट) रत्नांतहि सर्वश्रेष्ठ ज्ञानगुण संपन्न अशा गुरुंनाहि गुरुस्थानीं असलेल्या, (भक्तांना सर्व प्रकारची) वैभवे देणाऱ्या व करांबुजी दंड कमंडलु घेणाऱ्या, कमलाप्रमाणे सुकोमल, प्रसन्नवदन अशा देवाधिदेवा (श्रीसद्गुरुनाथा) श्रीदत्तात्रेयमूर्ते, मी आपणाला अभिवादन करतों. मी (षड्रिपु आणि) सर्व वासनांच्या समुहांत सापडून, संसाररुपी अग्नीच्या ज्वालांनी चांगलाच ग्रासला गेलों आहे. अहंकारमदानें उन्मत्त झालेला मी अज्ञ बालक आहे. तुम्हीच मा मातापित्याच्या जागीं आहांत आणि मी तुम्हाला पुत्रस्थानीं आहे





हे गुरु, सार्वभौम, श्रीवासुदेवानंद सरस्वती सद्गुरो! तुमचा शिष्य असणाऱ्या मला, इथून पुढे माझा अधःपात न व्हावा म्हणून, हातीं धरुन (जीवनांतील महत्तम असें) ज्ञानरहस्य शिकवा.

संकल्पासह नेहमीचे सर्वउपचार करून वरील श्लोक प्रतिदिन किमान २४ वेळा, किमान २ वर्षे (अर्थाकडे लक्ष देवून) म्हणावा. श्रीसद्गुरुंची भेट व कृपा लाभण्यास खूपच मदत होईल. मार्गदर्शन लाभेल.

★ ★ ★

## खरे आध्यात्म म्हणजे काय?

'परस्पर देवो भव'। जेथे समर्पणासह कुशाग्र बुद्धिमत्ता, शांतता, पावनता, प्रसन्नता, आनंद, शांति, समाधान, सौजन्य, साधेपणा, सहिष्णुता, सात्विकता आदि गुण दिसतील, तेथे अध्यात्म नांदते, बहरते, मोहरते, सर्वांगाने प्रगट होते.

गुजराथचे एक संतश्रेष्ठ प.पू. श्री दासानुदासजी दयानंदतीर्थजी म्हणतात.

'अन्य बहुत-सारे मनुष्यों की अपने प्रति की शुभ भावनाओं से ही हम ईश्वर तरफ आगे बढ सकते है। इसलिए जैसे बने वैसे अन्य मानवियों के ह्रदय प्राप्त कर लेना सीखो और उसके लिए तुम तुम्हारा अंत:करण ज्यादा और ज्यादा निर्दोष बनाओ।'

'ईश्वर का दिव्य आनंद अगर तुम्हे प्राप्त करना हो, तो अन्य को दुखदायी विचार, वाणी और वर्तन छोडो।'

'साधक मिटकर आश्रित हो जा।'

★ ★ ★

## अशुभ काळ-राहूचा

'काय दीपकशेठ, बरेच अस्वस्थ दिसता आहात.'

दादरला, गोंधळींच्या घरांत शिरतां शिरतां मी विचारणा केली.

'आहे थोडासा अस्वस्थ. आज उगाचच खटखट झाली परचेस ऑफिसर बरोबर.'

'कुठें ?'

'वरळीला, ग्रीव्हज कॉटन कंपनींत.'

'चालायचंच......'

'माझंच चुकलं ?'

'काय चुकलं ?'





'आज बुधवार, दुपारी १२ ते १.३० पर्यंत राहू काळ होता. त्यावेळेंतच नेमका मी कंपनींत पोहोंचलो. कंपनीच्या गेटजवळ परचेस ऑफिसर श्री.आठवले भेटले. 'परचेस ऑर्डर हातांत पडण्याअगोदर, कामाला कां सुरवात केली ?' विचारीत होते.

'अहो, साहेब....'

कांहींही न ऐकतां ते तरातरा डिपार्टमेंटमध्यें निघून गेले.

'दीपकशेठ, ही राहू काळ म्हणजे काय भानगड आहे ?'

'काय, बाबा ? भानगड कसली ? तुम्हांला माहीत असेलच राहू काळाचं महात्म्य.'

'तें माहीत असतं, तर तुम्हांला कशाला विचारलं असतं.'

'खरंच ?'

'सांगा आतां. उगाच 'नमनाला घडाभर तेल नको.' बोला.'

'राहू काळांत प्रवासास सुरवात करणे. नवीन महत्त्वाचे व्यवहार ठरविणे. सरकारी कामें हाताळणें, महत्त्वाच्या गांठीभेटी वा मुलाखतीस जाणें टाळावें. विनाकारण कामाला दिरंगाई होणे, गैरसमज होणे, प्रवासांत अकल्पित अडचणी येणे, महत्त्वाची कामें लांबणीवर पडणे, प्रसंगीं ती रद्द होणे, गांठीभेटींत वादविवाद होणे, अशा सारख्या घटना घडतात.'

'पण, हा राहू काळ समजायचा कसा ?'

'तेंच सांगतोना. हा घ्या राहू काळाचा तपशील.'

- **सोमवारी** सकाळीं ०७.३० पासून ९.०० वाजेपर्यंत
- **मंगळवारी** दुपारीं ०३.०० पासून ४.३० पर्यंत
- **बुधवारी** दुपारीं १२.०० पासून १.३० पर्यंत
- **गुरुवारी** दुपारीं ०१.३० पासून ३.०० पर्यंत
- **शुक्रवारी** सकाळीं १०.३० पासून दुपारी १२.०० पर्यंत
- **शनिवारी** सकाळीं ०९.०० पासून १०.३० पर्यंत
- **रविवारी** सायंकाळीं ०४.३० पासून ६.०० पर्यंत

'व्वा. झकास. दीपकशेठ, धन्यवाद !'

'धन्यवाद कसलें बाबा ?'

'तुम्हीं अगदीं सहजपणे, न कुरकुरतां, ही माहिती दिलीत म्हणजे.....'

'म्हणजे काय ?'

'आतां निश्चित 'राहू काळ' नाही! आतां आमच्या चहाचं बघा.'

'अवश्य. मीच करतों चहा, फक्कडसा.' स्वयंपाकघराकडे वळतां दीपकशेठ म्हणाले.

★ ★ ★